राजहंस प्रकाशन : ३

# शल्यें

— लेखक —

भ. दि. गांगल, बी. ए.




एप्रिल १९४४ ]

[ किंमत २ रुपये

# प्रास्ताविक

शल्य म्हणजे कुसळ- किती लहान असतें तें ! पण तें शरिरात शिरलें रे शिरलें की लगेच घर करूं लागतें—माणसाच्या मनाला लागलेल्या कुसळाचा —शल्याचा हा संग्रह आहे आणि म्हणून त्याला नांवहि " शल्यें " असेंच देण्याचें योजिलें

शल्यें म्हणजे एकाच व्यक्तीच्या आयुष्यात घडलेले प्रसंग नव्हेत. ऐकलेल्या, पाहिलेल्या वा अनुभवलेल्या प्रसंगांतून मानवी मनाचें, मानवी स्वभावाचें, साम्यस्वरूप जेथें जेथें चित्रित करणें इष्ट व शक्य वाटलें, तेथें तेथें शोधक नजर फिरविली. सत्य, वास्तव व प्रसग ह्याची प्रतिष्ठा राखून, कलेची व कल्पनेची कानस मारून शक्यतों लघुकथेच्या तंत्रांत शल्याना अवतरूं दिलें.

ह्यात कोणा व्यक्तीची निंदा किंवा हेटाळणी नाहीं. प्रत्येक माणसाकडे अत्यंत सहानुभूतीने बघून, माणूस कळत न कळत एकमेकाची जी आगळीक करतो व नंतर त्याबद्दल त्याला हळहळ वाटूं लागते त्याची ही प्रतिबिंबे आहेत गुणांचा गौरव पण अन्यायाची चीड, आणि असहाय, निष्पाप जीवाना आधार देण्याची उत्सुकता हेंच मला वाटतें प्रत्येक सहृदय माणसाच्या प्रत्ययास येणारें मनुष्य स्वभावाचे सात्विक स्वरूप. भावना आणि विचार एरवीं भिन्नस्वरूपी असले तरी ते जोडीजोडीनें आणि सलोख्यानें नांदत असतात ह्या जगात.

शल्याची ही अशी बैठक आहे. गुन्हेगारांना शिक्षा करून त्याना अधिकच निगरगट्ट करण्याचा ह्यांत प्रकार नाहीं. गुन्हेगारांना भावनांचा आणि विचारांचा मलिदा चारून आत्मसंशोधनानें स्वयंशुद्ध करण्याचा उपक्रम आहे हा. कुणाहि माणसानें कुणाहि माणसाचा द्वेष करूं नये, कुणाशीहि शत्रुत्व धरूं नये, माणसामाणसानें आपापसांतील वैमनस्य आणि मतभिन्नता शक्यतों कमी करीत असावें, हें तत्त्व आहे ह्यात......

मोठमोठाले प्रश्न सगळेच हातमळून पाहातात. पण बारक्या बारक्या प्रश्नाना आणि प्रसंगाना मुळींच महत्त्व न दिल्या कारणानें त्या प्रसंगाचें मोल सहसा ध्यानीं येत नाहीं, त्यापासून आलेल्या अनुभवाचे बीज होत नाहीं, आणि म्हणून त्या दृष्टीनें 'शल्यें' हा किंचित् नवीन असा प्रयत्न केला

आहे. वास्तविक तंत्राच्या दृष्टीनें बघितलें तर ह्यात नवीनता मुळींच नाहीं. " परिणामाची एकमेवता " हें जें लघुकथेचे मुख्य तंत्र तें संपूर्णपणें अवलंबिल्यास येथेंहि कलेचा विकासच दिसेल, पण फरक एवढाच कीं कथा-कादंबऱ्या एक वा अनेक प्रश्न–मोठमोठाले सुद्धां प्रश्न--सहज हाताळूं शकतात. तसें येथें करणें तितकेसें शक्य नाही--बोलूनचालून शल्यें हीं !

" शल्यें " हा संग्रह मनात योजल्यास उणीपुरी दोनतीन वर्षें होऊन गेलीं. वास्तविक माझें " पाझर " नावाचें पुस्तक प्रकाशित झालें, त्या आधींच हा संग्रह प्रकाशित व्हावयाचा. परंतु; " लेखक " आणि " प्रकाशक वा संपादक " ह्यांचे एकमेकाचे संबंध किती सलोख्याचे, आत्मीयतेचे, सहानुभूतीचे आणि कर्तव्यप्रेरित असतात हें स्पष्टच आहे. वास्तविक संपादक किंवा प्रकाशक हे लेखकाना वाङ्मयाच्या प्रांगणात वाचकांपुढें आणून त्याना कलेच्या कसरती आणि मानवी मनाची स्वरूपें दाखविण्यास वाव देणारे उत्कृष्ट वाटाडे होत. ह्याहि पुढें जाऊन मी म्हणेन कीं, शाळेंतील हुषार मुलगे शोधून काढून त्यांना हाताशीं धरून त्याची अभ्यासांत विशेष प्रगति होण्याकरितां झटणारे कळकळीचे ते मास्तर होत.

परंतु आपले संपादक व प्रकाशक उत्कृष्ट वाटाड्या अगर कळकळीचा मास्तर ह्यापैकीं एक तरी भूमिका पार पाडताना दिसतात का ? ते तसे दिसत नाहीत हें कटु कां होईना, पण एक सत्य आहे. मला वाटते कीं, सद्यःस्थितीत त्याना ह्या दोन्हीहि भूमिका मान्यच नसाव्यात, कारण अनुभव असा आहे कीं, काहीं अपवाद सोडले तर सहसा संपादक व प्रकाशक आपणांस लेखकाचे आपण कोणी वरिष्ठ आहोत असेच समजताना दिसतात. ते तसें स्वतःस समजत नसले अगर तसें काहीं ते जाहीर करूं शकत नसले तरी त्याची लेखकाशी वागणूक खात्रीनें एखाद्या कचेरींतील अहंमन्य वरिष्ठासारखीच भासते.

माझे बरेच मित्र मला पुष्कळ वेळा विचारतात कीं, तुम्ही अलीकडे लिहित का नाहीं ? तुमची लेखणी विराम पावली का, असाहि उपहास-गर्भध्वनि काहींच्या चौकशींत असतो. असे प्रश्न विचारणाराना माझें एक उत्तर ठरलेलें असतें कीं, जीवनव्यवसाय व इतर कामें ह्याची विपुलता एवढी आली आहे कीं इच्छा असूनहि, वाङ्मयसेवेला सवड मिळत.

नाहीं. ह्या माझ्या उत्तरानें प्रश्न विचारणाराचें समाधान होतें अगर नाहीं हा प्रश्न गौण आहे. पण एवढें मात्र नक्की कीं ह्या उत्तरानें माझें स्वतःचें मात्र बिलकुल समाधान होत नाहीं जीवनव्यवसाय व इतर कामें हीं जादवीं आहेत, ही जरी वस्तुस्थिति असली तरी " व्हेअर देअर इज ए विल्, देअर इज् अे वे " ही म्हण काय, खोटी आहे काय ? आगगाडीचे डबे असतात. एक डबा ओढला, किंवा ढकलला कीं दुसरे डबे हलूं किंवा चालूं झालेच पाहिजेत, पण तो लाल डोळ्याचा काटकोनांत उभा असलेला सिग्नलचा खांब, हल्लींच्या वाढत्या वाहतुकीच्या दिवसांत, मार्गदर्शन करण्याऐवजी, पुढें जाण्यास परवानगी देण्याऐवजीं, बरेच वेळा मार्गाची अडवणूकच करताना दिसतो नाहीं का !

लेखकाची, तरुण लेखकाची शोधाशोध करून, त्याच्या गुणाचा विकास करण्याचें पुण्यकर्म करण्याऐवजीं आमचे संपादक वा प्रकाशक नुसत्या परीक्षकाची भूमिका घेऊन प्रकाशनास आलेल्या लेखाचे वा पुस्तकाचे गठ्ठे समोर ठेवून केवळ पास, नापास, पसंत, नापसत हे छाप मारीत बसण्यांत धन्यता मानताना दिसतात. अर्थात् साहित्य क्षेत्रांतील कांहीं प्रमुख लेखक कीं, ज्यानीं आपलें नाव कायमचें आधींच कमावून ठेवलें आहे, त्याच्या बाबतींत पसंत-नापसंत असले छाप मारणें त्यास शक्य नसतें, उलट ते देतील तो माल, व घेतील ती किंमत असाच व्यवहार त्याना करावा लागतो हें जरी खरें असलें, तरी इतराच्या बाबतींत त्याची दृष्टि वरीलप्रमाणेच असते ह्यांत मतभेद होईलसें वाटत नाहीं.

मी जरी कोणी प्रमुख साहित्यिक नसलो, एवढेंच काय, पण प्रमुख साहित्यिकाशी माझा एवढा परिचयहि नसला तरी साहित्य प्रांतात मी आज कांहीं नव्यानें प्रवेश करीत नाहीं खास ! ह्या खेळात मलाहि कांहीं अनुभव आलेले आहेत. आणि त्यापैकीं पहिला अनुभव असा कीं, आलेले लेख अभ्यासु-वृत्तीनें वाचून, ते दुरुस्त करून, वरच्या दर्जाचे कसें दिसतील वा होतील ह्यासबधीं कांहीं विधायक सूचना देणें तर बाजूसच राहिलें; पण पसंत न पडल्यास ते साभार वा विनाभार परत करण्याकरितां का होईना, पण काळजीनें आणि व्यवस्थितपणें संभाळून ठेवणेंहि किल्येकास जमत नाहीं. एकदोन जबाबदार संपादकानीं मजकडून मागून नेलेले लेख

महाल, 'मिस्प्लेस्' केल्याचे मजजवळ पुरावे आहेत. ही जर मागून घेतलेल्या लेखांची गोष्ट, तर मग भिक्षेकरूचीच जणुं भूमिका नशिबी आलेल्या नव्या नव्या लेखकाच्या लेखाची गत काय होत असेल हें ज्या त्या लेखकालाच माहीत ! संपादक वा प्रकाशक ह्यांना त्या चिल्लर लेखांची मोजदाद ठेवण्यास वेळ व काळजी दोन्हीहि नसावीत खरोखर ! माझा एक लेखक-मित्र, त्यानें लिहिलेल्या कादंबरीचें हस्तलिखित, एका प्रकाशकाने ती प्रकाशित करतो म्हणून त्याला दिलेलें आश्वासन, पण तत्पूर्वी ती वाचून काढतो म्हणून दाखविलेली उत्सुकता, आणि सहा महिन्यांत चार निरोप व दोन खेपा घातल्यानंतर तें हस्तलिखित मी अजून वाचलें नाहीं, तें मी कुठेंतरी खुणेनें ठेवलें आहे, मी लवकरच शोधतो तें म्हणून दाखविलेली आशा, आणि अखेरीस "सापडत नाहीं बुवा—व्हेरी सॉरी" म्हणून निकाल ! ही त्या हस्तलिखिताची आणि बिचाऱ्या लेखकाची करुण कहाणी मला प्रत्यक्ष माहीत आहे कादंबरी लिहून काढण्यास त्याला किती श्रम पडले असतील हें काय सांगावयास का हवें ? पण तिचें खरें मोल कळायला जबाबदारीची तीव्र जाणीव पाहिजे, लेखकवर्गाकडे जरा निराळ्या नजरेनें संपादक व प्रकाशक वर्गानें बघावयास पाहिजे. लेखक कोण, छोटा की मोठा ? नवा की जुना ? छापील पुस्तकाचा खप कितपत होईल ? ह्याच व्यापारी नजरेनें लेखाच्या किंवा पुस्तकाच्या प्रकाशनाची ठरवाठरवी व्हावयाची असल्यामुळें प्रमुख लेखकाशिवाय इतर लेखकाची काळजी पाहिजे तितकी घेतली जात नाहीं. व्यापारीदृष्टि ठेवल्याशिवाय प्रकाशन-संस्था चालणार नाहींत हें मला माहीत नाहीं असें नाहीं. पण त्याला संपूर्ण प्राधान्य मिळण्यासारखी वाईट गोष्ट नाहीं असें माझें मत आहे.

गेल्या वर्षी दिवाळीच्या सुमारास, एक महिनाभर आधीं, एक संपादक दुसऱ्या एका संपादकाकडे बोलत बसले होते. कर्मधर्मसंयोग असा आला कीं, त्या ठिकाणीं त्याच वेळीं मला व माझ्या दुसऱ्या एका लेखक—मित्राला जाण्याचा प्रसंग आला. दोघेहि संपादक महाशय आपापल्या दिवाळीअंकाच्या लेखांची जमवाजमवी करण्याच्या खटपटींत दिसत होते. त्या दोघांच्याहि आम्हीं दोघे चांगले परिचयाचे होतो. आम्हीं लिहितो, लिहूं शकतो, परिणामकारक व लोकप्रिय लिखाण आमच्या हातून ओळंकार झालें आहे, हेंहि

ह्या दोघांना माहीत होते. पण ते संपादक होते आणि आम्हीं लेखक होतो. ते वरिष्ठ आणि आम्ही कनिष्ठ हे आमचे अन्योन्य संबंध त्यावेळीं माझ्या वागलेच प्रत्ययास आले. त्यांनीं सुचविलें असतें, तर आम्हीं त्याच्या अंका-करिता खचित काहींतरी विशेष असे लिहिलें असते. आम्हीं पुष्कळ गप्पा मारल्या; पण त्यांनीं आम्हास लेखासंबंधीं, किंबहुना आमच्या लेखनव्यव-सायासंबंधीं विचारलें नाहीं. अर्थात् स्वाभिमान आम्हीं अजून विकला नसल्याकारणानें आम्हींहि त्याच्याजवळ आमचा एखादा लेख घ्याल का म्हणून लाचारी दाखविली नाहीं. दोघाचेहि दिवाळी अंक प्रसिद्ध झाले–आम्ही तें कौतुकानें वाचलेहि–पण तुम्हीं अलीकडे लिहित का नाहीं ? तुमची लेखणी विराम पावली का ? थंड पडली का ! असे प्रश्न वि· ·ाऱ्या माझ्या मित्रांना ह्या प्रसंगात थोडेसें उत्तर मिळाले आहे असें मला वाटतें. प्रत्यक्ष भेटूनसुद्धा संपादक महाशय आम्हास अनुल्लेखानें मारू शकतात तर मग आम्हीं जर कोडगेपणानें त्यांचेकडे आमचे लेख अनाहूत पाठवीत असलों तर त्याची विल्हेवाट काय होईल हें न कल्पिलेलेच बरें

ह्यावर असा एक आक्षेप येण्याचा संभव आहे कीं लेखकानें लिहिलेलें लिखाण योग्य दर्जाचें असेलच कशावरून ? संपादकवर्गाकडून आलेल्या मान्यामध्यें निरर्थक, फालतु, टाकाऊ अशा तऱ्हेचे लेख शेंकडा पाऊणशे असतात–म्हणून संपादक स्वानुभवानें सांगतील. गोष्ट खरी आहे; पण माझ्यामतें हा मुळीं वादाचा प्रश्नच नव्हे संपादकांना गुरुजींच्या स्थानीं कल्पावयाची आम्ही तयारी दाखवीत असताना त्यानी आपलें श्रेष्ठत्व आणि अधिकार, लेख कळकळीनें दुरुस्त करण्यात, किंवा लेखकाना विधायक सूचना देण्यात आमच्या प्रत्ययास आणिलें तर आम्हीं त्यांच्या सूचनाबद्दल त्यांचे ऋणीच होणार नाहीं का ? पण तसें काहीं होत नाहीं, होणार नाही आणि हल्लींची पद्धति थोडीफार बदलल्याशिवाय हीच कहाणी चालू राहणार हें निश्चित.

आणि ह्यांतूनच आणखी एक महत्त्वाचा मुद्दा आपोआप निघतो; आणि तो असा कीं, ज्या संपादक वर्गाला लेखकानीं--तरुण लेखकानीं--गुरुच्या-स्थानीं कल्पावयास तयार असावयाचें तो संपादक वर्ग तो मान घेण्यास समर्थ आहे कां ? ह्या बाबतीत मी जर माझें प्रामाणिक मत लिहिलें तर प्राच्या-

एक माझ्यासारखा माझ्याहि डोक्यावर प्रहार होण्याचा संभव आहे; परंतु ज्यावेळीं वृद्ध तात्यासाहेब करंदीकर किंवा तरुण प्रभाकर पाध्ये ह्यांच्यासारखे कसलेले वृत्तपत्रकार काहीं एका तत्त्वप्रणालीवर मार्टे-प्रकरणाचा समाचार घेत होते, त्यावेळी तीन वेळा मॅट्रिक नापास झालेला आणि नुकताच एका वर्तमानपत्र कचेरींत नोकरीस लागलेला एक मुलगा स्वतःस लगेच संपादक संप्रदायातील एक अधिकारी व्यक्ति समजून केवढी तरी वाष्कळ बडबड करताना मी ऐकत होतो. आणि ती बडबड ऐकून माझ्या एवढें मनात मात्र आलें की, संपादकीय खुर्चीवर बसण्यास जे गुण लागतात त्याचें कांहीं-तरी प्रमाण निश्चित व्हायलाच पाहिजे.

लेखकवर्गांच्या कुचंबणेचें दिग्दर्शन करताना संपादक व प्रकाशक आपली सामाजिक जबाबदारी पाहिजे त्या प्रमाणात पार पाडीत नाहींत--लेखकांना पाहिजे तशी आणि पाहिजे त्या प्रमाणात मदत करीत नाहीत, करू शकत नाहींत, असें ज्या वेळी मी म्हणतो त्यावेळीं त्यांची बाजू, त्यांच्या अडचणी मी नजरेआड करतो असें सूचित नव्हे. हल्लींच्या आर्थिक काळात संपादकीय व्यवसायात वेतन म्हणजे किती अल्प असतें! संपादकीय जबाबदारी लेखक अनिश्चिततेन त्याप्रमाणें पार पाडण्यास त्यांनीं बिचाऱ्यांनीं वेळ व उत्साह आणावयाचा तरी कुठचा! आणि ह्याला उपाय म्हणूनच, मी म्हणतों, कीं पुढेंमागें लवकरच संपादक वर्गानें, साहित्यश्रेष्ठींच्या मदतीनें वा देखरेखीखालीं ह्या बाबतींत एकत्रित जमून कांहीं विचारविनिमय करावयाचे ठरविलें व संपादक होण्यास कांहीं बौद्धिक मर्यादा ठरवून स्वतःस पुरेसे वेतन व मानाचे आश्वासन जर ते मिळवूं शकले तर खात्रीनें होतकरू लेखकाचा वाङ्मयीन-विकास अधिक जोरानें होऊं शकेल.

मनात येणारानें संपादक व्हावें व पैसा असला कीं प्रकाशक व्हावें व अनियंत्रितपणें संपादन व प्रकाशन ह्या दोन्ही क्रिया व्हाव्यात ही कल्पनाच मुळीं मूलतः हानिकारक आहे. वाङ्मयाच्या प्रत्येक भागात साहित्यश्रेष्ठींची आणि संपादकप्रमुखांची एकेक समिती असावी, त्यांच्याकडे लेखकांनीं आपापले लेख वा ग्रंथ आपण होऊन परीक्षणार्थ व दुरुस्तीकरिता पाठवावे व मूळ अगर दुरुस्त झालेले असे लेख व ग्रंथ कीं जे संपादक व साहित्य

समितीनें मजूर केले आहेत असे आणि एवढेच लेख वा ग्रथ आपण आपल्या मासिकात, नियतकालिकात छापूं व प्रकाशित करूं असा निर्बंध संपादक व प्रकाशकानीं स्वतःवर लादून घ्यावा, एकदम एवढें शक्य नसले तरी शेकडा कांहीं प्रमाणात तरी उपनिर्दिष्ट समितीकडून आलेल्या लेखाचें आणि ग्रथाचें प्रकाशन आपण करूंच करू असा दंडक संपादक प्रकाशकानी आपणावर लावून घेतला तर मला वाटतें कीं एरवीं ओळखींखातर, भिडेखातर, पैशाच्या आधारावर जें काय प्रकाशन झालेले आढळून येतें व कांहीं प्रकाशन छापील स्वरूपात येण्यासारखे असून येऊ शकत नाहीं ह्या अनर्थाला खचित थोडातरी आळा बसेल. ह्यात लेखाच्या व ग्रंथाच्या मोबदल्याचा प्रश्न अजून जमेसच धरला नाहीं. मला वाटतें दोनतीन नियतकालिकें सोडून दिली तर इतर नियतकालिकें सर्वसाधारण अगर नव्यालेखकाला मोबदला देऊ करतात हें कांहीं माझ्या ऐकिवात नाहीं लेखकाचा लेख पसत पडला कीं त्याचा मोबदला देणें आपलें कर्तव्य आहे ही कल्पनाच मुळीं विचारार्थ येत नसतें. कारण लेखकांचा लेख प्रसिद्ध करणें म्हणजेच मुळी त्याच्यावर उपकार करणें होय अशा वृत्तीनेंच आपलें संपादन चाललें असल्यामुळे लेखकाची योग्यता राखणें व वाढविणें, त्याचा मान राखणें, तो स्वत:पेक्षा श्रेष्ठ असा मानला नाही तरी तो आपला कनिष्ठ नव्हे, त्याचे आपण वरिष्ठ नव्हे, ह्याची जाणीव ठेवणे आपणास जरूर आहे हे जर का पटलें, तर मोबदल्याशिवाय लेख छापणें ही लाजेचीच गोष्ट आहे असें संपादकाना खचित वाटू लागेल. प्रकाशनासंबधीं तर ह्याही पलीकडे अनास्था दिसते. अनेक तरूण लेखकाना उत्कृष्ट वाङ्मय प्रसविण्यापेक्षा प्रसिद्धीचीच अधिक लालसा असते. आणि ती पुरी करण्याकरिता ते प्रकाशकाना स्वतःच पैसे देऊं करतात—किंबहुना कित्येक प्रकाशक असे पैसे पदरात पडल्याशिवाय प्रकाशनाला संमतीच देत नाहींत. प्रकाशनाचा येत लेखकानें पैसे पुढें करण्यावरच अवलंबून असतो. आणि अशा प्रकाशकाकडून फालतू वाङ्मय प्रकाशित होत असले व प्रकाशित व्हायला पाहिजे तें वाङ्मय जर प्रकाशित होत नसले तर त्यात आश्चर्य काय! फालतू ग्रथ प्रकाशित केल्यास त्याची विक्री तितक्या प्रमाणात कदाचित होत नसेल व त्यामुळें प्रकाशकाचा थोडाफार तोटाहि होत असेल पण लेखकानें पुढें

केलेल्या पैशानें अगतः तरी तो तोटा आधीच भरून निघलेला असतो आणि त्यामुळें प्रकाशकाबद्दलच्या बाबतींत हळहळ करण्याचे कारण नाहीं. वरील विवेचन अर्थातच प्रमुख साहित्यिकांच्या बाबतींत लागू नाही. त्यांचा योग्य तो मान संपादक व प्रकाशक ठेवतातच, नव्हे तो त्यांना ठेवावाच लागतो; पण सर्वसामान्य लेखकाचे बाबतींत व नवोदित लेखकाचे बाबतींत उपरिनिर्दिष्ट परिस्थिति खचित आहे

आपणाजवळ उत्कृष्ट संपादक अजिबात नाहींत असें मुळींच नाहीं. मी एक उत्कृष्ट लघुकथा लिहिली होती. एक संपादक मजकडे आले असताना माझें काहींतरी नवीन लिखाण पाहण्याची त्यांनीं इच्छा दर्शविल्यावरून मी ती गोष्ट त्यांना वाचून दाखविली. सुमारे तीन दिवसांनीं तेच संपादक सुप्रभातीं मजकडे आले आणि मला म्हणाले, "तीन दिवस मी तुमच्या गोष्टीवर विचार करीत होतो......ती गोष्ट तुमची हरकत नसेल तर मी छापणार आहे, पण त्यात काहीं बदल करावयास पाहिजे आहे." माझ्या त्या-वेळच्या उतावीळ स्वभावानें मी त्यांना म्हटलें कीं, मग तुम्हीच त्यात योग्य वाटेल ती सुधारणा करा—माझी त्याला काहीच हरकत नाहीं, पण संपादकांनीं तें कबूल केलें नाहीं. ते म्हणाले कीं, "तसें करावयाचें असतें तर मी तुम्हाला विचारण्यास एवढा लांब आलोच नसतो. मी ज्या काय सूचना करणार आहे, त्याबद्दल तुम्हीं विचार करा, गोष्टींत तशा तऱ्हेचा बदल काय म्हणून असणें इष्ट आहे हें समजावून घ्या आणि तें तुम्हांस सारे पटले तरच तुम्हीं बदल करा आणि ता माझ्या मदतीनें पण स्वतःच्या हातानें करा... कारण मी जें काय तुम्हाला सांगणार आहे तें ह्या एकाच गोष्टीला लागू नाहीं तर तें तत्त्व तुमच्या साऱ्या कथा वाङ्मयाला उपयुक्त होणार आहे..."

आणि पुढें आमचें त्यासंबधीं चर्चात्मक बोलणें झालें आणि त्या बैठकींत त्या संपादकांनीं मला जें काहीं सांगितले, त्याचें मोल इतकें मोठें होतें कीं, त्याचा बरोबरीच मला अजूनहि उपयोग होत असतो. संपादक मला कनिष्ठ, दुय्यम दर्जाचा समजत नव्हते. त्या गोष्टीमध्यें त्यांना काहीं गुण दिसले, ते त्यांनीं वाढीस लावले—संपादकीय कर्तव्याला ते जागले... त्यांनीं मला कायमचें ऋणी करून ठेवलें... !

आणि म्हणून म्हणतो कीं, संपादक आणि प्रकाशक ह्यांनीं व्यवहारा-

बरोबर जर कर्तव्याची जाणीव ठेवली तर त्यांच्या हातून फार मोठे कार्य झालें असें होईल. मुसलमान मुल्ला ज्याप्रमाणें आयुष्यामध्यें एका परधर्मीयाला मुसलमान केला की मोठ्यात मोठें पुण्य मिळविलें आणि जन्मास आल्याचें सार्थक झाले असें समजतात, त्याप्रमाणें आमच्या संपादकांनीं आणि प्रकाशकांनीं काहीं एका कालमर्यादेंत एक तरी नवीन लेखक आपण पुढे आणू, एक तरी आदर्श ग्रंथ आपण कोणाकडून तरी लिहून घेऊन तो प्रकाशित करूं, असा निश्चय केला, अशी शपथ घेतली किंबहुना अशी आपापसात चढाओढ आणि अहमहमिका सुरू केली तर त्यांचे मराठी भाषेवर केवढे तरी उपकार होतील!

माझी खात्री आहे की आज मराठी भाषेच्या वृक्षाना कितीतरी फुले येत आहेत. सुंदर आणि सुवासिक आहेत तीं. पण तीं कुठेंतरी फुलतात, केंव्हातरी गळतात, आणि मातीस मिळतात बिचारीं! वृक्षाना मुबलक पाणी घालण्यास, त्याचा पद्धतशीर विकास करण्यास, फुलाचे गजरे आणि गुच्छ करून त्याचा सुवास वाचकापर्यंत पोचवण्यास आणि मराठी भाषेचें वैभव वृद्धिंगत करण्यास आज आपणाजवळ अधिकारी, कर्तव्यप्रेरित असे संपादक फार थोडे आहेत प्रकाशकाची दृष्टि [illegible] अधिक, कागदी आणि नकली फुलाचाच गौरव जास्ती. अर्थातच प्राप्त परिस्थितीत संपादक आणि प्रकाशक-वर्गाचा थोडा राग संपादूनहि तरुण व होतकरू लेखकाच्या कुचंबणेचें हे गाऱ्हाणें वाङ्मयविकासाच्या दृष्टीनें महत्वाचे वाटल्यावरून मराठी [illegible] मांडलें आहे ह्यात कुणाहि व्यक्तिगत संपादकाला अगर प्रकाशकाला उद्देशून मी लिहिलेलें नाही. वस्तुस्थिति ही अशी आहे आणि हें सारे स्पष्टपणें लिहिताना काहीं संपादकाना व प्रकाशकाना आपला व आपल्या पंथाचा मी मोठा अपमान केला आहे असेंहि वाटण्याचा संभव आहे. परंतु मोठ्या गोष्टी प्राप्त करून घेताना बारक्या गोष्टींना महत्त्व द्यावयाचे नसते, ह्या न्यायानें वाङमय-विलास व वाङ्मय-वृद्धि हे अंतिम ध्येय ठेवून संपादक व प्रकाशक मला क्षमा करतील आणि प्रस्तुत वादाविषयीं त्याचें काहींही मत असलें तरी पुस्तकातील शल्याचें परीक्षण ते [illegible] न होता निःपक्षपातीपणानें करतील अशी मला आशा आहे.

संपादक व प्रकाशक ह्याच्या हातीं नियतकालिकें व छापखाने आहेत. माझ्या हातीं कांहींच नाहीं. एवढें स्पष्टीकरण केल्यानंतरहि एखाद्या तापट संपादकाचें समाधान झालें नाहीं व मी वस्तुस्थितीचें वर्णन केल्यामुळें आपल्या शक्तीचा व अधिकाराचा फायदा घेऊन मजवर प्रहार करावयाचें त्यानें ठरविलेंच तर तें त्यास अगदी शक्य आहे—मी त्यावर कांहींच करूं शकणार नाहीं, पण तो प्रहार सहन करण्यास हृदयाची ऐरण करून मी तरीहि म्हणेनच कीं, मी काय लिहिलें तें सारें तुम्हास पटत नसलें तरी आहे ह्या स्थितींत कांहींतरी आणि कुठें तरी थोडा बदल व्हायला पाहिजे आहे असें तुम्हास खरोखरीच वाटत नाहीं का !

फाटक-वाडा, ठाणें.<br>
हल्लीं मुक्काम - उरसळ बिल्डिंग,<br>
एस्. पी कॉलेज समोर, पुणें शहर.<br>
एप्रिल १९४४.

—भ. दि. गांगल.

## — भ. दि. गांगल यांचीं पुस्तकें —

### प्रकाशित

*१ आसवांची माळ*

एक करुण भावकथा

प्रस्तावना—श्री. अनंत काणेकर

२ क्षण-चित्रें

पहिला लघुकथासंग्रह

प्रस्तावना—श्री. के. नारायण काळे

*३ पिंजऱ्यांतील पक्षी*

कादंबरी

४ पाखरं

[ दुसरा लघुकथासंग्रह ]

५ शल्यें

[ तिसरा लघुकथासंग्रह ]

### आगामी

*१ रंगाचें घर*

कादंबरी

*२ विकार आणि वात्सल्य*

व इतर गोष्टी

[ चौथा लघुकथासंग्रह ]

# कथानुक्रम

## मास्तरांचीं मुलें : : १

काका, माझे वडील, शाळा तपासणारे एक अधिकारी होते— पगार म्हटला तर त्यांना कांहीं फार नव्हता त्यावेळी. दोन तीनशे रुपये म्हणजे जिल्हाधिकाऱ्याला काहींच नव्हे—पण ते शाळा-खात्यात तरी एका जिल्ह्याचे अधिकारी होते एवढी मात्र गोष्ट खरी !

जिल्हाधिकाऱ्यांची एकमेकांशीं आपोआपच ओळख होते म्हणून का बड्या अधिकाऱ्याकडे छोटें अधिकारी नेहमींच थोडेफार पुढें पुढें करतात ह्या नियमाला आमचे काका संपूर्ण अपवाद नसावेत म्हणून—पण त्याची आणि काळे कलेक्टरांची ओळख होती आणि पर्यायानें त्यांच्या घरीं आमच्या घरातल्यांचा थोडाफार शिर-काव होता !

पण, का नकळे, मला काळे कलेक्टरांच्या घराचा नेहमी तिटकाराच वाटायचा ! त्याची पोरें नेहमीं आपल्याच तोऱ्यांत, आपलाचं बडेजाव मिरवीत नेहमीं वावरायचीं आणि वर त्यांनीं कांहींहि केलें तरी त्याचें नेहमीं सर्वांकडून कौतुकच व्हावयाचें !

ह्याबद्दल मला त्याचा राग येई—मी त्यांचा मनांतल्या मनांत द्वेष, तिटकारा करी—!

अन् त्या दिवशी संध्याकाळी साहेबांच्या बंगल्यावर मुलांचें "पिक्‌निक्" होतें! माझी तिकडे जाण्याची इच्छा नव्हती—नि म्हणून मी अनेक सबबी सागू लागलों—गांवांत सर्कस आली होती, व रात्रीं आमचें सर्कसला जावयाचें आधींच ठरलें होतें तेव्हां साहेबांच्या घरीं संध्याकाळीं गेलों आणि परत यावयास उशीर झाला तर एखादे-वेळीं सर्कस हुकेल म्हणूनहि सागून पाहिले—पण तें कुणाला पटलें नाहीं—आईनें तर फारच आग्रह चालविला आणि काकांनीं तर मला शेपाटलेंच जवळजवळ—"साहेबाकडलं बोलावणं येतंय कुणाला एवढं?" अन् जरा नाखुषीनेंच मी साहेबांच्या बंगल्यापर्यंत एक मैल चालत गेलों!

मी कांही फार मोठा नव्हतों त्यावेळी—असेन तेराचौदा वर्षांचा. अन् साहेबांचा मुलगा जयंत, तोहि माझ्याच वयाचा! मी एक जिल्हाधिकाऱ्याचा मुलगा असलों तरी आजपर्यंत माझ्यावर कोणच्याहि पिक्‌निक् पार्टीला जाण्याचा प्रसंग आला नव्हता—खरें सागायचें तर पिक्‌निक् म्हणजे मोठ्यांच्या मुलांची भातुकलीच होय हें मला त्यावेळपर्यंत माहीत नव्हतें!

मी अंगणांत शिरलों—मर मध्यावर तीनचार टेबलें ठेवून त्यावर स्वच्छ चादरी पसरल्या होत्या—आणि त्यांच्यावर नाना तऱ्हेचीं फळें आणि इतर खाद्य पदार्थ व्यवस्थेनें मांडून ठेवले होते! अंगणांत शिवाय चहूंबाजूला पुष्कळ खुर्च्या, स्टुलें होतीं—कांहीं स्टुलावर पत्ते होते, एकावर कॅरमबोर्ड होता—खेळाचीं अनेक साधनें जमवून ठेवली होती तिथें!

जयंत "टिप् टो" ड्रेस करून तेथें जमलेल्या मुलांशीं गप्पा करीत होता--मी बघितलें कीं जयंत, त्याच्या दोन बहिणी व दोन

आऊ ह्याच्याशिवाय जी तिथें दहावीस मुलें जमली होतीं, त्यांपैकीं बहुतेक कोणी डिस्ट्रिक्ट जज्जांची, कोणी पोलीस सुपरिंटेंडेंटची, कोणी एक्झिक्यूटिव्ह इंजिनिअरची, एकूण एकेका बड्या साहेबांचीच प्रजा होती ! प्रत्येकाचा संपूर्ण युरोपियन पोपाक होता--नुकतेच पॉलिश केल्यामुळें प्रत्येकाचे बूट नुसते लकलक करीत होते !

माझे कपडे घाणेरडे नव्हते--चांगले पर्राट घडीचे कपडे घालून गेलों होतों मी--पण ते युरोपियन पद्धतीचे नव्हते -उदाहरणार्थ माझ्या पायात बूट नव्हते, चपला होत्या. माझी नेसूं विजार नव्हती धोतर होतें -माझ्या डोक्यावर हॅट नव्हती, टोपी होती !

"काय रे आलास ?" जयंतच्या आईनें माझें स्वागत केलें-- "जयंत, घ्यारे ह्याला खेळाला...."

अन् सारीं मुलें माझ्याकडे बघू लागली ! कांहीं आमच्या शाळे-मध्येंच येणारी असल्यामुळें माझ्या माहितीची होती, तर काहींची मला मुळीच माहिती नव्हती. पण त्यावेळीं मात्र मला तिथें बघून कदाचित त्याना आश्चर्य वाटलें असेल आणि म्हणूनच बहुतकरून ती माझ्याकडे टवकारून बघूं लागली असतील !

"येरे, बस ." जयंतनेंहि उपचार थोडासा पाळला आणि इतर मुलाशीं बोलण्यात तो पुन्हा गर्क होऊन गेला !

माझी मोठी चमत्कारिक स्थिति झाली--बड्या लोकाच्या मुलात आपल्यासारख्या मध्यम वर्गीय लोकाच्या मुलानीं कसें वागावें म्हणजे बरें दिसेल हें कांहींच कळेना ! चुकून आपण जास्ती कमी आपण होऊनच बोललों तर आपलेंच एखादेवेळीं हंसें व्हावयाचें--आपणांस इंग्रजी चागलेंसें हुकमी अजून बोलतां येत नाहीं आणि येथें पहावें तों नेहमींच्या सरावानें बहुतेक मुलें इंग्रजींतच थोडी फार गप्पागोष्टी करीत आहेत--एकूण त्यांची भाषा, त्यांचे रीतिरिवाज सारें सारें आपणांस अपरिचित आहे--अन् मी बुजलोंच जवळ जवळ, माझी

मलाच लाज वाटूं लागली--कुठल्या वातावरणांत आणि कशाला आपण आलो इथें असें मला होऊन गेलें ! आणि अशा परिस्थितींत आपण कसें वागावयाचें--कशी वेळ मारून न्यावयाची ह्यासंबंधी मनातल्या मनात विचार करता करतां जसें इतर करतील तसें आपण करावयाचें, कोणी काही प्रश्न विचारला तर त्याला तेवढें आपण उत्तर द्यावयाचे असा मी मनाशी बेत ठरविला--पण खरं सांगायचं म्हणजे नाक तोंड दाबलें कीं जीव जसा गुदमरून जातो तशा सारखीच काही माझी अवस्था झाली होती तिथे त्यावेळीं !

अन् सर्व मुलानी फराळास आरंभ केला--अनुभवाभावी माझी जराशी तिरपीट उडत आहे ही गोष्ट ध्यानात आली म्हणून, का सहजच न कळे. पण जयंत माझ्याकडे वळून म्हणाला--" हं चालूं दे, बघितलं होतस का आजपर्यंत पिकनिक् म्हणजे काय तें ? "

उपहास ' गिळला नुसता मी तो त्यावेळी ! अन् ह्यावर एकाने जयतला जराशा विचित्र नजरेनें हळूच विचारलें--" कोण रे तो--?"

-अन् जयंतला वाटलें असेल की माझें लक्ष्य नाहीं--पण मी स्पष्ट ऐकलें आणि बघितलेंहि-

" अं." अशा तऱ्हेचे उद्गार काढून जयतने अशा तऱ्हेने आपली मान वेळावली की, त्याच्या भाषणाचा उद्देश असा होता कीं मी आहे आपला कोणीतरी एक. झालं !

मला काटा बोचला--मी घायाळ झालों ! अपमान, जन्म-असह्य वेदना--

अन् पिकनिक् म्हणजे काय हें चांगलेंच समजावून घेऊन मी कसा तरी घरीं परतलों !

अन् घरीं येतों तो काकाच्या थोडेसे परिचयाचे एक मराठी मास्तर रजा संपल्यामुळे आपल्या शाळेच्या गावीं हजर होण्याकरतां आपल्या दोन मुलाना घेऊन बोटेंत आमचेकडे उतरले होते !

बरोबर नऊ वाजतां काकाशिवाय आम्ही सर्वजण सर्कसला जाण्यास निघालों--मास्तर आणि मास्तराची मुलें पाव्हणीं--तेव्हां उपचार म्हणून किंवा काहीहि म्हणा पण आईनें विचारलें--" काय रे, मुलानो, तुम्हाला यावयाचें आहे का ?"

मुलांनीं आपल्या वडिलाकडे दृष्टि लावली--आमच्याच वयाचीं मुलें होती तीं--सर्कस बघायला मिळाली तर त्याना ती अर्थात हवीच होती--पण वडिलाचा रुकार आल्याशिवाय तीं हो म्हणून कशी म्हणणार एकदम ?

अन् त्या लहान वयामध्येहि एक गोष्ट माझ्या ध्यानांत आली--आईचा त्या मुलाना प्रश्न, आणि त्या मुलाची मास्तराकडे--आपल्या वडिलाकडे--किंचित आशाळभूत नजर हें सारें घडत आहे न आहे तों मास्तर आपले खिसे चाचपूं लागले--अन् त्यांनी विचारलें--

" शेवटचें तिकिट केवढ्याचें आहे ?"

" चार आण्याचें." माझ्या पाठचा भाऊ ओरडला !

" बर जा !" म्हणून मास्तरानीं काहीं पैसे आपल्या मोठ्या मुलाजवळ दिले !

आम्ही घराबाहेर पडलों आणि त्यावेळींच आमच्या शेजारच्या वाड्यातील मंडळी बाहेर पडली.--आम्हीं मुलें मुलें एकमेकात मिसळलों--आमच्याबरोबर दोन नवखीं मूलें आहेत हें दिसताच एकानें मला सहजच विचारलें--

" कोणरे हीं पोरं ?"

अन् अगदीं चुकून नकळतच माझ्या तोंडून उद्गार बाहेर पडले--

" अं:" अन् अशा तऱ्हेनें मी मान वेळावली कीं माझ्या अगदीं सांगण्याचा उद्देश जणूं असा होता कीं, तीं आहेत झालं कुणाची तरी मुलं !

अन् मी बघितलें--मास्तराचा मोठा मुलगा माझ्या अगदीं मागो-

माग चालत होता--अन् त्यानें खचित, खचित, आमचें संभाषण ऐकलें--अन् राखेंतल्या निखाऱ्यावर पाय पडून पायाला एकदम चटका बसावा तसा मला एक चटकाच बसला जणू--मी शुद्धीवर आलो--जयंतनें ज्या वाक्यानें आणि ज्या नजरेनें आपला उपहास केला त्याच वाक्यानें आणि त्याच नजरेनें मास्तराच्या मुलाचा आपण उपहास केला नाही का ?

अन् त्या रात्रीं माझें सर्कसकडे विशेषसें लक्ष लागत नव्हतें--दोन चित्रें- एक पिकूनिकचें स्मृतिचित्र आणि दुसरें मास्तराच्या मुलाचें चित्र माझ्या डोळ्यासमोर थैमान घालीत होतें ! आम्हीं एक एक रुपयांची तिकिटें काढून खुर्च्यांवर बसून सर्कस पहात होतों--अन् मास्तरांची मुलें, पिटात, धुळींत, मातीत बसून सर्कस बघत होतीं. मास्तर आमच्या घरीं थोड्या ओळखीचा फायदा घेऊन पाहुणे म्हणून आलेले होते--त्याच्याकरता थोडी झीज सोसून मास्तराच्या मुलांना आमच्याबरोबर घेणें आमचें कर्तव्य नव्हतें का? अन् झीज, झीज म्हणजे काय ? दोन रुपयांना आम्ही काही महाग नव्हतो--पण--पण मास्तराच्या मुलांची पीटचीं तिकिटेंसुद्धां आम्ही मास्तरांच्या पैशांतून काढलीं आणि त्याना पिटात ढकललें !

अन् मी जों जों विचार करूं लागलो—तों तो मला साहेबांच्या बंगल्यावर आपल्या झालेल्या प्रतारणेपेक्षा, अपमानापेक्षा, माझ्या हातून मास्तरांच्या मुलाची प्रतारणा, आपल्या हातून मास्तराच्या मुलाचा अपमान जास्ती वाटला ! साहेबाच्या बंगल्यावर पिकनिक चालूं असता आपला जीव जसा गुदमरला तसा मास्तराच्या मुलाचा जीव आता गुदमरून गेला नसेल का ? जयंताच्या घरी आपल्याला जशा तऱ्हेचा दंश झाला, काटा बोंचला, वेदना झाल्या, तशाच तऱ्हेची अवस्था आपल्या हातून मास्तराच्या मुलांची झाली नाही का ?

अन् माझ्या भावनामय मनाला त्यावेळी जो कांटा बोंचला आहे तो

अजूनही आहे तसाच आत रुतून बसला आहे—आज त्या गोष्टीला १०।१५ वर्षे झालीं असतील-काळानें आपल्या अतर्क्य बळावर काळे कलेक्टराना केव्हांच हिरावून नेलें—जयंत एक माझ्या सारखाच साधासुधा मध्यम वर्गातला खाऊनपिऊन सुखी मनुष्य म्हणून नांदत आहे, मास्तराचे मुलगेहि थोडेफार शिकून आमच्याच वर्गात आज मोडत आहेत, आणि त्यांत आम्ही सारेजण समाजात एकाच दर्जाचे म्हणून गणले जात आहोंत. आज मास्तराच्या मुलाची आणि माझी मधूनच केव्हा केव्हा नजरानजर होते—अन् त्यावेळी माझा काटा मला बोचूं लागतो--की वेड्या तुझ्या हातून मास्तरांच्या मुलाची एकदा आगळीक झाली आहे. झाडावर बसला असताना एका काळी ... तारका तुझ्याकडे बघून हंसली म्हणून ज्या तुला क्षोभ वाटला, तुझा अपमान झाला अन् म्हणून तूं घायाळ झालास, त्याच तू झाडावर बसून जमिनीवर चालणाऱ्या दोन निरपराधी जीवाची हेलना केली आहेस--आज काळानें तुम्हाला साऱ्याना एकाच पातळीवर आणून बसविले आहे- जयंतच्या हातून तुला झालेल्या जखमेची जयंतला जाणीव असो अगर नसो, फार काय मास्तराच्या मुलाना तुझ्या हातून झालेल्या जखमाची आठवणहि नसो--तूं आपला जा, आणि मास्तराच्या मुलांची क्षमा माग, निदान तुझी स्वतःची जखम उघडी तरी करून दाखव त्यांना !

अन् ज्या ज्या वेळी मी मास्तरांच्या मुलाना बघतों, त्यावेळीं काटा असा मला बोचू लागला की मी मनातल्या मनात म्हणतो कीं मास्तराच्या मुलांना थाबवून आपला काटा, आपली जखम दाखवावी त्याना—

पण, अजूनपर्यंत तसा मोका साधलेला नाहीं—त्यावेळेची मी वाट बघत ... तोपर्यंत मला काट्याच्या वेदना अशाच सहन करीत बसणें क्रमप्राप्त आहे !

## उपेक्षा



माणसाच्या आयुष्यांत अशा अवस्था, असे प्रसंग कित्येक बेळा येतात की दुसऱ्याच्या सहेतुक वा निर्हेतुक म्हणा पण क्षुल्लक बागणुकीनेंहि त्याच्या हृदयाला धक्के बसतात. आणि काहीं कांहीं वेळां असं बाटतं कीं, हें धक्के मिळण्यास जी व्यक्ति जबाबदार आहे, त्या व्यक्तीला तिच्या कृतीचा सरळ जबाब विचारावा, आणि आपलं हृदय हलकं झालं तर पहावं. .... पण त्या व्यक्तीचें सामर्थ्य, त्या व्यक्तीची परिस्थिति, सामाजिक दर्जा आणि आपली परिस्थिति आणि दर्जा वगैरेंची तुलना करूं लागलें कीं ध्यानांत येतें की लोखंडावर विटेनें प्रहार करायचें ठरविलें तरी वीटच फुटायची नाहीं का ?

अन् हीं जाणीव झाली की, मन जास्तीच चमत्कारिक होऊन जातें. झालेले अपमान, झालेल्या हेलना, कशाचाच तोंडावाटे उच्चार करता येत नाहीं—तोंड दाबून बुक्क्यांचा मार होतो.

वास्तविक किती क्षुल्लक गोष्ट होती ती ! गोष्ट होती म्हणण्यापेक्षां गोष्ट नव्हतीच ती ! माझ्या टेबलावर एक पाकीट पडलें होतें. तें पाकीट माझें नव्हतें, त्या पाकिटावर माझा पत्ता नव्हता, वास्तविक

त्या पाकिटाशी माझा असा संबंधहि नव्हता. त्यावर आमच्या वरिष्ठ अंमलदाराचे नांव होतें—वरिष्ठ अंमलदार अजून आले नसल्याकारणानें शिपायानें त्यांची पत्रें सहजच माझ्या टेबलावर ठेवली होती आणि त्या पत्रांतच तें पाकीट वर होतें. आणि गंमत अशी होती की, माझा अर्थाअर्थी काही संबंध नसलेल्या त्या पाकिटानेंच मला त्यावेळीं अस्वस्थ करून सोडलें होतें.

त्या पाकिटाच्या डाव्या बाजूच्या खालच्या कोपऱ्यात असलेल्या छापील अक्षरावरून तें पत्र कोणाकडून आलें आहे हें स्पष्ट होतें—महिला परिषद १९४४ ... ४ वाजल्यापासून महिला परिषदेचें यंदाचे अधिवेशन आमच्या गावात भरावयाचें होतें, आणि त्या परिषदेस हजर ... ता आमच्या वरिष्ठ अंमलदाराकडे परिषदेच्या कार्यकर्त्यांनी ... होती त्या पाकिटातून.

किती वेळ तरी मी त्या पाकिटाकडे नुसता बघत होतो! क्रोध, खेद, असूया, तिरस्कार कितीतरी संमिश्र भावना जमून आल्या होत्या माझ्या मनात त्यावेळी! मनातल्या मनात विवेकी बनण्याचा मी प्रयत्न करीत होतो. ... ...स्ते। मा फलेषु कदाचन। ...नें अर्जुनाला वाटेल तसा पढवला. फळावर आशा ठेवू नको—कर्म करीत रहा म्हणून त्यानें त्याला अट्टाहासानें सांगितलें, पण त्यावेळी, व्यवहारी जग, माणसाचें मन, माणसाच्या नैसर्गिक भावना ह्यांचा त्यानें खरोखरीच तितकासा विचार केला होता का?

त्याचें असें झालें होतें कीं, एक दोन प्रतिष्ठित बायका यंदाचें अधिवेशन आमच्या गावीं व्हावें म्हणून गेल्या वर्षी वक्तव्य करून बसल्या होत्या. तशा तऱ्हेचा ठरावहि आदल्या वर्षीच्या अधिवेशनांत पसार झाला होता, आणि तो खरोखरी अमलात आणावयाचा प्रसंग ज्यावेळीं येऊन ठेपला, त्यावेळीं अडचणींचे डोंगर दृष्टीस पडू

लागले. संमेलन बोलावणें ही जेवढी सोपी गोष्ट, तेवढीच तें पार पाडणे ही कठीण बाब आहे हें सर्वांच्या प्रत्ययास येऊं लागले.

कोणच्याहि समेलनाम मुख्य पात्रें लागतात ती म्हणजे, संमेलनाध्यक्ष, स्वागताध्यक्ष, कार्याध्यक्ष, चिटणीस वगैरे वगैरे. संमेलनाध्यक्षांच्या जागी जी व्यक्ति बसत असते ती बहुतेक सुविद्य, सुशिक्षित आणि लोकप्रिय अशी असते. ती व्यक्ति एकमतानें वा मताधिक्याने निवडून आलेली असते. तसेच कार्याध्यक्ष आणि चिटणीस ह्या जागाहि, अविश्रांत काम करण्यास तयार असणाऱ्या आणि तसें खरोखरी करणाऱ्या तडफदार अशा व्यक्तीकडे सहसा येत असतात. परंतु, स्वागताध्यक्ष ही जी एक, सभा संमेलनात, जागा असते, तिला वरीलपैकी कोणचेच गुण असले पाहिजेत असें नसतें. साधारणपणें श्रीमत आणि म्हणून इतराच्या दृष्टीनें मोठी अशी ही व्यक्ति असते. पैशाच्या जोरावर ह्या व्यक्तीचें गावात फार वजन असतें वरच्या दराच्या प्रवेशपत्रिका विकत घेणारे ते स्वागत-सभासद आणि त्यांचे अध्यक्ष म्हणजे स्वागताध्यक्ष ! समेलनाच्या [illegible] होण्याइतका मान [illegible] क्वचितच आढळायचा इतरत्र !

समासंमेलनाच्या अनुभव [illegible]च्या मदतीनें कार्य जोरानें चालू होतें. पत्रकें काढणें. कार्यकारी मंडळाच्या आणि स्वागत-मंडळाच्या सभा भरविणें, परिषदेचे कार्यक्रम निश्चित करणें, तिकिटाची विक्री करणे वगैरे सर्व अंगें आणि उपांगें व्यवस्थित चालली होती, पण त्याना एक प्रमुख अडचण भासली. ती म्हणजे एकच की, लांबून मुद्दाम आलेल्या संमेलनाध्यक्ष विदुषीचे स्थानिक स्त्रियातर्फे, स्वागतमंडळातर्फे, नवे ग्रामातर्फे ज्या स्थानावरून स्थानिक अध्यक्षबाईनी स्वागत करावयाचें—त्या स्थानाला शोभेल असें सरीव, उद्बोधक भाषण लिहून काढणें ही

होय ! अन् तें भाषण पाहिजे तसें प्रभावी तयार करणें ही बाब अत्यंत कठीण अशी भासल्यामुळें त्याना एका साहित्यिकाची जरूरी वाटत होती !

आमच्या गावामध्ये स्वतःला राजकारणातील किडे समजणारे अनेक किडे होते. स्त्रियांचे कैवारी होते, वेळी अवेळी वकिली आवेशानें व्याख्यानें देणारे वकीलही होते. पण ज्यावेळी भाषणे लिहिताना वाङ्मयीन जबाबदारीचा आणि भाषासपदेचा प्रश्न आला. त्यावेळी एकेक पळवाटा शोधू लागले, टोलवाटोलवी करू लागले, ह्याच्याकडून आपण भाषण लिहून घेतलें तर, त्याच्याकडून लिहून घेतलें तर, अशासारखी भाषा सुरू झाली

का आणि कशी नकळे, पण महिलांची नजर माझ्याकडे वळली. एका महिलेचे यजमान मध्यस्ती पडले. महिला परिषदेशी माझा काहीहि संबंध नसताना, 'स्वागता'ध्यक्षीय भाषण आम्हास तुम्ही लिहून द्याल का म्हणून मला प्रश्न विचारण्यात आला. नव्हे तशी गळच घालण्यात आली. मला त्याची विनंति अमान्य करवली नाही— मी तें काम मोठ्या आनंदाने आणि हौशीनें अंगिकारलें

आमच्या गावात माझ्यासारखे नाउमेदवार सर्ग-न-र आणखी दोन-तीन ..ह-ि..े . होते. स्वागता-यक्षीय भाषण दुसऱ्याने लिहून द्यावयाचें, मग तें आमच्यापैकी कुणीहि लिहून देऊ शकला असता. पण तो मान आज मला मिळाला होता. मला थोडा अभिमानच वाटत होता. मोठ्या उमेदीनें मी भाषण लिहून काढीत होतो.

निष्काम कर्मयोग ! मा फलेषु कदाचन ! फळावर खरोखरीच काही नजर ठेवली नाही मी ! तीन रात्री जागून काढल्या मी त्या कार्याकरिता. एका दमडीचीहि आशा न धरता, एवढंच काय पण त्या भाषणाचें पितृत्व आपणाकडे असलें तरी त्याचें स्वामित्व किंचितहि

आपण प्रस्थपूं शकणार नाही ह्याची पूर्ण जाणीव असूनहि मी माझें काम निष्ठेनें करीत होतो.

आणि ज्या क्षणी माझें लिखाण पुरें झालें, त्याक्षणी केवढा आनंद झाला मला ! आणि ज्यावेळी तें लिखाण मी कार्यकर्त्या महिलांच्या हातात दिलें आणि त्यांनी उलट " आमचें मोठें एक काम केलेंत तुम्ही " म्हणून आभारप्रदर्शक मुद्रा केली त्यावेळीं मला वाटलें की, आयुष्यात आपल्या हातून आज एक उत्कृष्ट गोष्ट घडली—अत्यंत समाधानी मनाने मी त्या रात्री झोपी गेलो.

आणि अशा त्या महिला परिषदेची वरिष्ठ अंमलदाराच्या नांवची ती आमंत्रणपत्रिका बघून माझ्या मनाचा दाह होत होता ! आणि त्याच कारण असं होतं की, माझा त्या परिषदेशीं इतका निकटचा संबंध असतानाहि माझ्या वरिष्ठ अमलदाराना परिषदेचें आमंत्रण आलें होतें—आणि मला ?

महिला परिषदेच्या चालकांनी परिषदेच्या पटांगणात कोणाहि पुरुषाचा शिरकाव होऊं द्यावयाचा नाही म्हणून एखादा ठराव वा नियम केला असता तरीहि त्रिशंकुवर्गीय म्हणून आत शिरकाव मिळण्याचा माझा अधिकार आहे असें मी समजत होतो, पण आज परिस्थिति अशी झाली होती की, त्यांचें काम झालें होतें, त्याची अब्रू बचावली होती, त्याना माझी आणि माझ्या कामाची आठवणहि नव्हती बहुतकरून.

केलेल्या कामाचा मोबदला आणि वेतन नको होतें मला, फळाची मुळीच आशा धरली नव्हती मी, पण साधी पोंच, कृतज्ञता तरी ?

माझ्या मनात आलें, माझ्या वरिष्ठाला परिषदेचा एक कल्पित हितचिंतक म्हणून पदरचें पैसे खर्च न करतांहि आमंत्रण येतें,

येऊं शकते, पण मला ? का झाला असेल हा असला पंक्तिप्रपंच ? कस झालं माझं विस्मरण त्यांना ? सधन आणि निर्धन ह्याच्या प्रमाणावरच व्यक्तिव्यक्तींच्या आणि संस्थाच्या हालचाली होत असतात असंच नाहीं का हें ? परिषदेच्या कार्यकर्त्यांनी गावातील बड्या बड्या 'प्रस्थाना' बोलावलेंच पाहिजे—मानच आहे त्याचा तो !

चटकाच बसला मनाला माझ्या. आशा मोठी वेडी असते. एकदा वाटे की अजूनहि येईल आमंत्रण ! आमंत्रण आल्यामुळे माझ्या अंगावर मूठभर मास अधिक चढणार होतें असें नव्हे. एव-ढेंच काय, आमंत्रण आल्याबरोबर मी परिषदेला जाणार होतो असंच नव्हे—दुसर असं की मी जें भाषण लिहून दिलें होतें, अशा तऱ्हेचे भाषण दुसऱ्या कोणीहि त्याना पुरविलें नसतें असेंहि नव्हे, मी त्याना मदत केली नसती तर त्याचा दिवस साजरा झाला नसता असंहि नाही, पण मनाची आपली वेडी समजूत की, ज्या अर्थी मी आज त्याच्या कार्याला हातभार लावला आहे, त्याअर्थी त्याना आज माझी पडलेली विस्मृति ही माझी उघड उघड उपेक्षा आहे—हा बडघडीत अन्याय आहे ! कसं होईल परिमार्जन ह्याच ?

वरिष्ठाची आज्ञापत्रिका आपल्याकडील मी इतर पत्राबरोबर आत पाठवून दिली आणि मी आपल्या कामास लागलो पण कामा वर चित्त लागत नव्हते. तेच तेच विचार...पुन्हा वाटे अजून येईल आपल्या नावची चिठी—परिषदेची चालक मडळी आणि त्यातल्या त्यात स्वतः स्वागताध्यक्ष बाई आणि मध्यस्ती पडलेल्या महिला आणि त्याचे यजमान हे मला विसरणें शक्यच नाही.

चार वाजता परिषदेला सुरवात होणार होती-- आगाळभूत नजरेनेंच मी त्या न येणाऱ्या आमंत्रणाची वाट पाहत होतो. अन् मग एखादा क्षण असा येतो कीं, त्याक्षणी माणसाच्या हातून

पूर्वी न योजलेल्या, किंबहुना त्या क्षणापूर्वी कसली कल्पनाहि नस-लेल्या अशा कांही गोष्टी घडून जातात. ..

समोर कोरा कागद होता --- आणि त्या कागदावर अक्षरें लिहिली जात होती —

" श्रीमती स्वागताध्यक्ष ह्यास—

स्वागतपीठावर उभें राहून मोठ्या अभिमानानं आणि दिमाखानं आपण आता जें भाषण करीत आहात तें भाषण आपल्या स्वतःच्या विचारांचे आणि बुद्धीचें बालक आहे असें जरी तेथें जमलेल्या साऱ्या समाजाला तुम्ही कदाचित भासवीत असला, आणि तें भाषण आपण ज्या व्यक्तीकडून लिहून घेतलें आहे त्या व्यक्तीची आपणास व आपल्या परिषदेस साफ विस्मृति पडली असली, तरी ती व्यक्ति आपणास भलत्याच वेळी त्याच गोष्टीची आठवण करून देत आहे ह्याबद्दल जरा दिलगिरी वाटते. ज्याच्या जिवावर, मिळालेल्या मानास आपण पात्र आहोंत म्हणून जगाला भासूं द्यावयाचे, त्याची काम झाल्याबरोबर विस्मृति होणे ही गोष्ट एकंदरीत सदसद्विवेकबुद्धीस आणि शिष्टाचारास धरून आहे काय ? आपली परिषद यशस्वी होवो एवढेंच इच्छितो मी !"

ज्या हिरहिरीनें मी तें पत्र लिहिलें त्याच हिरहिरीनें मी शिपा-याला हांक मारली आणि त्याला सांगितलें की, आत्तांच्या आत्ता हें पत्र घे आणि स्वागताध्यक्षबाईनीं आपलें भाषण वाचण्यास सुरवात केली रे केली की आत शिरून तांतडीनें त्यांच्या स्वतःच्या हातात व्यासपीठावर नेऊन दे. हेतु हा की, हें पत्र मिळाल्याबरोबर आपण वाचीत आहोंत ह्यापैकीं आपलें असें कांहीच नाहीं सारा पढतप्रकार, अन् ही गोष्ट उद्या चवाठ्यावर गेली तर !... वगैरेची त्याना क्षणांत जाणीव

व्हावी — नव्हे तें पत्र वाचून, छापील भाषण वाचताना, अंगाला घाम फुटावा, हातपाय कापूं लागावे, जीभ तोतरी ठगावी. ..

तसं बघितलं तर मला विसरण्यात [illegible] [illegible] एकट्याच जबाबदार नसतीलहि, कदाचित् एका निष्पाप जीवाला जबरदस्त शिक्षा झाली असेल ती माझ्या हातून, पण लेखणीच्या प्रभावानें हृदयाचे पालट घडत असतात आणि उद्वेगानें लिहिलेल्या त्या पत्राचें सार्थकच झालें असं मी समजतो.

## दिशाभूल : : ३

त्या दिवशी रात्री आठचे सुमारास अगाऊ काही कल्पनाहि नसताना गोरे वकील आमच्या घरी आला. पहिल्या चारपाच मिनिटात ज्ञातिसंघाच्या हालचाली, स्थानिक राजकारण, क्रिकेटचे सामने वगैरे काहीतरी विषयावर किरकोळ संभाषण आल्यानंतर गोरे वकीलाने येण्याचे खरें कारण सांगितलें कोणा मुलीच्या बापाने माझ्या भावासंबंधीं चौकशी करण्यास त्यास सांगितलें होते आणि त्याच कामगिरी ।न॰ तो इकडे वळला होता आज

" त्या बाबतीत आमच अस ठरल आहे की सिलेक्शन वगैरे सगळ त्याच त्यानी कराव आणि ते मारं एकदा मुक्रर झाल की पुढची सारी व्यवस्था आमच्याकडे... . " मी स्पष्टीकरण केलें.

" बराच लिबरल झाला आहेस कीं ".

" म्हणजे, मी लिबरल नव्हतों कशावरून ? " त्याचा अभिप्राय तितकासा न आवडून मी प्रतिप्रश्न केला.

अन् ह्यापुढें ... ओघ घरगुती चौकशी... वळला. गोरे वकिलानें तत्संबधी जरा जिव्हाळ्याचे असे प्रश्न विचारावे आणि

आपल्या कौटुंबिक प्रगतीचें आपण मोठ्या आनंदानें वर्णन करावें ही गोष्ट फार गोड वाटली मला.

"तुझे भाऊ दोघेहि कायम झाले कारे?"

"हो हो..."

"चांगले चान्सेस् मिळवले त्यानी–मोठा म्हणजे लघुलेखक नाही का?"

"हो त्याला दीडशेचा स्टार्ट मिळाला." मी कौतुक दर्शवीत म्हटलें.

"अन् धाकटा म्हणजे एम्. ए...."

"हो, एल्फिन्स्टनमधला लेक्चरर"

आणि अर्धे मिनिट थांबल्यासारखें करून एखाद्या विषयाचा अखेरचा निष्कर्ष सांगायचा म्हणूनच बणूं गोरे वकील म्हणाला–

"अस्सं! म्हणजे एकूण तिघा भावांमध्यें तूच एकटा मागे पडलास म्हणायचा!"

मीच एकटा मागे पडलों! कांहीतरी अनपेक्षित आणि चमत्कारिक, कानावर पडल्यासारखें मला वाटलें. जरासा अस्वस्थच झालों मी. मैत्रीच्या सलगीनें गोरे वकीलान्या तोंडून उच्चारलें गेलेलें तें वाक्य सुईसारखें टोंचून बोचून गेलें मला.

मी ज्या परिस्थितींत नोकरी धरली होती ती परिस्थिति आणि माझ्या भावांची वेळोवेळची परिस्थिति यांत किती तरी अंतर होतें. माझ्या भावांसारखा, [illegible] चागला पगार मिळाला नव्हता मला क्वचित्, पण मिळालेल्या जीवनांत आनंद कल्पून, भावांच्या शैक्षणिक प्रगतींत आणि त्याच्या नशीबवान् आर्थिक सुरवातींत अभिमान मानून मी मागें पडायच्याऐवजीं पुढेंच चालली आहे, असें प्रामाणिकपणानें वाटत होतें मला. एवढंच नव्हे, तर आपली नोकरी संभाळून रिकाम्या सांपडलेल्या वेळांत मूळपासून हौस असलेली थोडी-

कार साहित्योपासना करून, चारदोन पुस्तकें प्रसिद्ध झाली होतीं माझ्या नावानें आज ! अतिमहत्त्व देण्यासारखें वाङ्मय नसेल तें; पण शेंकडा पंचाण्णव लोक जें करीत नाहींत, करूं शकत नाहींत तें माझ्या हातून झालें होतें, होत होतें; आणि तरी गोरे वकील मला म्हणाला,—" म्हणजे तूंच एकटा मागें पडलास !"

सहज बोलता बोलता का होईना, पण गोरे वकिलानें माझा उपहास केला होता—उणीव नसताना माझ्यामधील एक उणीव दाखविली होती. मनात आलं कीं त्याच्याबरोबर तडकाफडकीं वाद-विवाद घालावा—बाप दाखव नाहीं तर श्राद्ध कर, मी मागें पडलों कसा हें सिद्ध तरी कर, नाहींतर बोललेले शब्द माघारे घे एकदोन क्षणांत खळबळून आलेले विचार ते...... मी कांहींच बोललों नाहीं. गोरामोरा झालेला चेहरा क्षणार्धांत निर्विकार केला आणि गोरे वकिलाबरोबर पूर्वीसारखाच मी बोलत राहिलों.

गोरे वकील केव्हांतरी मग निघून गेला. पण जरावेळापूर्वी रुतून बसलेलें तें कुसळ सारखें सलत होतें मला ! आणि का तें न-कळे, पण गोरे बकिलाची आणि आपली पहिली ओळख केंव्हा झाली, त्याचा आपला परिचय केंव्हां केंव्हा आणि कसा कसा वाढत गेला, त्यासबंधीचा सारा इतिहास आपोआपच माझ्या नजरे-खालून सरकू लागला.

गोरे वकिलाबद्दल आदरापेक्षा कुतूहल आणि जिज्ञासाच अधिक वाटत असे मला. पहिल्यापासून रात्रपाळीची सरकारी नोकरी संभा-ळून उच्चशिक्षणक्रम पुरा केला होता म्हणे त्यानें. इतकेंच नव्हे, तर ज्यावेळीं अखेरीस तो वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झाला, त्यावेळीं त्यांचे सहकारी, अधिकारी वा मित्र त्याला पुष्कळ उपदेश करीत होते कीं सुखाचे वाढते शेंसव्वाशें रुपये सोडून अशाश्वताच्या मागें

कशाला जातोस ? तरीसुद्धां त्यानें कोणाचें काहीं ऐकलें नाहीं; त्यानें पहिल्या सपाट्यासरशी सनद काढली.

एकदोन वर्षें माझ्या पुढेंच होता तो. मला तो ओळखत असे; मीहि त्याला ओळखत असे; पण फार घरोब्याच्या भेटीगाठी होत नसत आमच्या तेव्हां. पुढें मी बी. ए. होऊन नोकरीस लागलो आणि तो एल् एल्. बी. होऊन वकिलीकरता म्हणून आमच्याच शहरांत राहूं लागला. तेव्हा मात्र पूर्वीपासूनची त्याच्याबद्दलची माझी जिज्ञासा अधिकच वाढली, आणि

त्याची वकिली कशी काय चालते, त्याचें गावात एकंदर बस्तान कसें काय बसलें आहे, इकडे माझें सहजच मधून मधून लक्ष असें. त्याच्या दारावरून मी जातयेत असताना तो आपल्या खुर्चीवरून मला हांक मारीत असे—जेव्हा पहावें तेव्हा चारदोन जाडीजाडी कायद्याची पुस्तकें टेबलावर विखरून पडलेली, सातआठ अर्ध्या मोडलेल्या कोर्टाच्या फाइली तशाच टेबलावर काहीं एकत्र तर काहीं उघडून मध्यावर पसरलेल्या

" भारी काम पडतं बुवा वकिली म्हणजे अगदीं ब्लड सकिंग ..." एक दिवस तो मला म्हणाला होता.

" कुणाच ? " मी विनोदानें विचारलं.

" अरे स्वतःच—वकिलाच म्हणतोय रे मी. "

" पण पैसे कसे मिळवता ? "

" तितकं राहिलं नाही धंद्यात ह्या आता. "

" पण थोडसं राहिलं आहे ना ? "

" तू पण माझ्यावरोबर वकिलींत बोलायला लागलास. "

" नोकरीपेक्षा वकिली बरी कीं नाहीं ? " मी त्याला सरळच प्रश्न विचारण्यास आरंभ केला.

" तें तर केव्हाहि. "

"असला प्रश्न विचारणं तितकसं शिष्टाचाराला धरून नाहीं, पण आज दोनतीन वर्षांच्या प्रॅक्टिसनंतर नोकरींतल्या पगाराइतका तरी पैसा हुकमी हातीं येतो का सरासरीनें आतां?" ।॰॰॰॰॰, वकीलीला चांगला पैसा मिळूं लागण्यास कमीतकमी चारपांच वर्षांची तरी उमेद्वारी करावी लागते अशा कल्पनेनें मी त्याला तसें विचारलें होतें.

पण त्याच्या उत्तरानें मी आश्चर्यचकित होण्यापेक्षा थिजलों आणि विरमलोच होतो मनातल्या मनांत. तो माझ्याकडे बघून जरा विचित्रतेनेंच त्यावेळीं हंसला आणि म्हणाला होता,—

"वेडा आहेस "

"कां?" जरा भीतभीतच मी प्रतिप्रश्न केला.

"नोकरीतला पैसा कसला रे?"

" नोकरीतल्या पगाराच्या काहीतरी पटींनी त्याला महिना पैसा मिळत असावा, अशा मुद्रेनें त्यानें मजकडे बघितलें. आपला अंदाज चुकला आणि उगाचाच आपण त्याला तो प्रश्न विचारला म्हणून मला हळहळ लागून राहिली. पुढें त्यासंबंधी मी फारसें बोललो नहतों. मी तो विषय आटोपता घेऊन जराशानें मुकाट्यानें घरी परतलों होतों.

× × × ×

झालेल्या फजिती आणि अज्ञानप्रदर्शनाबद्दल तर मला राहून राहून वाटत होतेंच, पण त्याबरोबरच अवघ्या दोनतीन वर्षांत वकिलींत इतका पैसा मिळविणारा, इतकें यश संपादन करणारा हा गोरे वकील किती असामान्य बुद्धीचा आणि कर्तबगारीचा असला पाहिजे, ह्यासंबंधीहि विचार माझ्या मनांत जातयेत होते. मी बाहेर तसें कांहीं बोलून दाखविलें नाहीं, पण गोरे वकिलाबद्दलचा माझ्या मनातील आदर आतां वृद्धिंगत मात्र होत होता.

वकिलीमध्यें राम नाही, शहाण्या माणसानें हल्लींच्या दिवसांत नोकरीच शोधीत, आणि ती मिळाली कीं करीत रहावें, असा कोणी 'मेरा लडका'च्या बापानें वाधंग उपस्थित केला तर त्याला मी गोरे वकिलाकडे बोट दाखवीत असे—आदर्श तरुण म्हणून मी वेळींअवेळीं मित्रमंडळीजवळ त्याची स्तुतीहि करीत असे.

आणि तोच हुषार आणि कर्तबगार गोरे वकील आज मला म्हणाला होता की, तूंच एकटा मागें पडलास! खरं आहे का हें? कोणत्या आधाराबर, नव्हे कसल्या जोरावर असं बोलला तो?

मी विचार करूं लागलों. गोरे वकील, वकील होता. त्याला वकिलीत गडगंज पैसा मिळतो हें त्यानें स्वतःच मला पुष्कळ वेळां दर्शविलें होतें. माझी माझ्या मात्राशीं तुलना करताना, तो पुष्कळ कमाई करणारा वकील, आणि मी त्यामानानें कितीतरी कमी पगार मिळविणारा एक नोकर, हा आमच्या दोघामधील तुलना दर्शविणारा उपहासच नव्हता का त्याच्या वाक्यात प्रतीत होत? ज्या गोरे वकिलाच्या धडाडीबद्दल आणि कर्तबगारीबद्दल मला आदर वाटत होता, त्याच्यामध्यें अहंभाव, स्वतःबद्दलच्या भलत्याच कल्पना, नव्हे अहंगंडाचा जबरदस्त वास आला मला. आणि त्या अहंगंडाच्या निशेंत तो मला हिणवूं शकला, "म्हणजे, तूच एकटा मागें पडलास!" असंच नसेल कां सारें हें?

पण त्याच्या उलट .

"अत्युच्चीं पदि थोरही बिघडतो" ही उक्ति जरी सर्वथैव खरी असली, तरी त्या व्यक्तीच्या बिघडण्यामुळें तिची थोरवी कांही कमी होत नाहीं. गोरे वकील जरी त्याच्या वाढत्या वैभवामुळें, मला वाटत होतें त्याप्रमाणें, चढून गेला असला तरी त्यानें मिळविलेल्या यशाबद्दल तो आदरास पात्र नव्हता का?

अहंमन्य का होईना, पण गोरे वकील एक तडफदार, कुशाग्र

वकील आहे ही जी माझी आधींची कल्पना ती मात्र जवळ जवळ कायमच होती अजून. पण त्याबरोबरच " तूंच एकटा मागें पडलास " म्हणून त्यानें मला केलेला व्रण मधून मधून पुष्कळ वेळां त्रास देई मला. वकील होऊन पुष्कळ पैसा मिळविणें म्हणजेच पुढें जाणें आणि नोकरी करून इतर कोणच्या व्यवसायांत कीर्ति मिळविली तरी तें मागेंच पडणें, हीच का पुढें जाणें आणि मागें पडणें ह्याची व्याख्या ?

अन् एक दिवस मी रजेवर असताना सहजच कोर्टाकडे वळलों. एक केस चालू होती—एका भिल्लावर खुनाचा आरोप ठेवला होता आणि कर्मधर्मसंयोग असा की, आरोपीचें वकीलपत्र गोरे वकिलास मिळालें होतें.

गोरे वकिलाची हुषारी प्रत्यक्ष बघण्यास मिळणार ह्यामुळें मला जरा बरें वाटलें. ' ह्या भिल्लानें गोरेसारख्या पुढारलेल्या वकिलाला कस काय गाठलं असावं बरं ? अन् गोरे वकिलाची फी हा कंगाल भिल्ल कुठून आणि कशी काय देणार बुवा ? ' पण मनात पुन्हा विचार आले कीं, जीव हा प्रत्येकाला प्यारा आहे. वकिलाच्या हिकमतीनें प्राण वाचणें शक्य असेल तर कर्ज करूनसुद्धा हुषार वकिलाची फी कबूल करणें भिल्लास क्रमप्राप्त नव्हतें का ? मी मागें बसून मुकाट्यानें खटल्याचें काम ऐकूं लागलों.

सरकारी वकिलाचा उपोद्घात झाल्यानंतर साक्षीस सुरवात झाली. " क्रॉस " करण्याची पाळी आल्याबरोबर गोरे वकील उठला. मी कुतूहलतेनें कान टवकारले.

मला जरा आश्चर्य वाटूं लागलें. पहिल्यापासूनच न्यायमूर्तींनीं गोरेसारख्या नाणावलेल्या वकिलावर तोंड सोडण्यास सुरवात केली. ' हा प्रश्न तुम्हांला कोणचा न्यायाधीश विचारूं देईल ?' ' तुम्हीं आरोपीचे वकील आहात हें ध्यानात आहे ना, मिस्टर गोरे....?' एकना

दोन, प्रत्येक प्रभागणिक न्यायाधीश गोरे वकिलाची अडवणूक करीत होता.

दुसऱ्या दिवशी ११ वाजतां सर्वांस फिरून येण्यास सांगून कोर्ट उठलें.

× × × ×

रोज सकाळीं कुमू नि मी दीड मैल लांब फिरायला जात असूं. आमच्यासारखे नियमानें फिरायला येणारे आणखीहि चारपांच इसम होते. त्यापैकीं एक कोर्टातला कारकून होता. ज्या झाडापर्यंत जाऊन आम्ही परत फिरत असूं त्या झाडाच्या पुढें जाऊन, आज आम्हीं परतण्याच्या सुमारासच, तो त्या झाडापर्यंत पोंचला होता.

आजपर्यंत प्रत्यक्ष कधींहीं त्याच्याशीं मी फारसा बोललों नव्हतों; पण काय असेल तें असो, आदल्या दिवसांच्या खटल्यासंबधी सहजच मी त्याला कांहीं प्रश्न विचारला. आम्हीं बरोबरच चालत असल्यामुळें त्या विषयावरच आम्हीं आणखी बोलत राहिलों.

मी त्याला माझी कालचीच शंका विचारली, "तो भिल्ल गोरे वकीलाची फी कशी काय देणार हो?"

"तो भिल्ल कशाला फी देतोय?"

"मग?"

"सरकार देणार."

"म्हणजे काय?"

"अहो तें चॅरिटी ब्रीफ् आहे."

"म्हणजे काय?"

"म्हणजे मुखत्यार वकीलपत्र. गरीब आरोपींचा पैशाच्या अभावीं एकतर्फी निकाल लागूं नये, स्वतःच्या बचावाची त्यांनां संपूर्ण संधि मिळावी म्हणून कोर्ट सहसा नवशिक्या वकिलांकडे असलीं कामें देत असतें."

“ न. पिं. ? गोरे वकील नवशिक्या !”

“ नाहीं तर ? त्याला काय येतं ? एल्एल् बी. कसा पास झाला कोणास ठाऊक ?”

“ तुमचं आणि त्याचं बर नाही कीं काय ? ”

“ तुमचं नि त्याचं नातंबितं आहे की काय ?”

“ छे : छे :.”

मला कशाचाच कशाशी मेळ घालता येईना. कोणी वाटेंत भेटलं म्हणून दोन मिनिटें आम्हीं बोलत उभें राहिलों. इतक्यात कोर्टातला कारकून पुढें सटकला.

अन् आम्ही चौरस्त्यापर्यंत येऊन पोंहोंचलों न पोंचलों तोंच दुसऱ्याच बाजूनें स्वतः गोरे वकीलच तेथें हजर.

“ ओहो, रोज फिरायला जाता वाटतं ? ” गोरे वकील थांबून म्हणाला.

“ हो. ”

“ चला की जरा घरी, चहा घेऊन जा.”

“ नको आत्ता....उशीर होईल नाहीं का ? कामाला जायचं असतं आम्हाला गार्डाने.”

“ पाच मिनिटें रे.”

मी कुमूकडे प्रश्नार्थक नजर टाकली. तिनें होकार दर्शविला. आम्ही गोरे वकीलाबरोबर चालू लागलों.

“ आमच्या मंडळीची नि तुमची ओळख आहेना मला वाटत ? ” गोरे वकीलानें कुमूला विचारलें.

“ तोंडओळख आहे. प्रत्यक्ष परिचय नाहीं. ” कुमूनें उत्तर दिलं.

आम्ही गोरे वकीलाच्या घरीं पोचलों. कोण आलें हें पाहण्यास बणूं, गोरे वकिलाची बायको आतल्या दाराशीं येऊन आम्हाकडे बघू

लागली. जगाचे छक्केपंजे फारसे माहीत नसलेली अगदीं साधी अशी बाई दिसली ती आम्हाला.

"हा कोण माहीत आहे का तुला ' पुरोहित, लेखक आहे थोडासा हा, माहीत आहे ना ?"

थोडासा लेखक ! वकिलीच्या धंद्यात निमग्न असताना, साहित्य-प्रांतात आपल्या बरोबरीचा, गावातीलच आपला एक मित्र काय काय कार्य करीत आहे. ह्यासंबंधी खरोखरी फारशी माहिती नसताना आणि ती मिळविण्याची काळजीहि कधीं न करताना गोरे वकीलानें 'थोडासा लेखक' म्हणून माझं मोजमाप करून आपल्या बायको-जवळ माझी ओळख करून देण्याचा देखावा केला ! पुन्हा माझ्या मनात आले की, मी मोठा एखादा लेखक नसेन, परतु उघड उघड इतका उपहास करून घेण्याइतका भुरटा वाङ्मयचोर तर नाही ना मी ?

पुन्हा झालेला हा अपमानवजा उपहास गिळलाच मी आणखी एकदा

"आणि ह्या ह्यांची. ओळखतेस का ह्यानां ?"

"हो, ऐकून माहिती होत त्या की आत." गोरे वकिलाच्या बायकोनें कुमूला घरात बोलावलें.

मी त्यावेळी गोरे वकिलाशी काय काय बोललों हे मला नीटसें स्मरत नाहीं. गोरे वकील माझ्याशीं आपल्या धंद्याविषयीं, धंद्यातील वाढत्या कमाईविषयी काहींतरी सांगत होता आणि मी व्यवहाराला धरून जें उत्तर सुचत होतें तें त्यास देत होतों. एक प्रश्न मात्र मी त्यास बुद्ध्या विचारलाच: "कालच्या केससंबंधीं काय अंदाज आहे तुझा ?"

"कालच्या ? त्या भिल्लाच्या ? तुला काय माहिती ? तूं हजर होतास कीं काय ?"

" हो, होतो थोडा वेळ—पण सगळंच चमत्कारिक दिसलं मला "

" चमत्कारिक ? जज्ज अडवीत होता मला म्हणून म्हणतोस होय ! अरे, तो जज्ज आहे पाजी त्याला माणुसकीच नाही काही दिवस ऐकून घेऊ आम्हीं . पण मग "

" मग काय ? "

" अरे बारमधून तक्रार—अर्ज गेले की त्याला समज यायचा राहील होय ? "

" अस का ? "

मला त्याच्या उडवाउडवीची गंमत वाटली. त्याने साक्षीदाराना विचारलेले प्रश्न अगदी खुळ्यासारखे होते, हें मजसारख्या 'अन-भिज्ञा'लाहि समजलें होतें आदल्या दिवशी. आणि तरीहि गोरे वकील जज्जालाच पाजी म्हणाला—पुन्हा मला संदेह उत्पन्न झाला, कीं ह्या साऱ्या गोष्टीची संगति कशी लावावी ?

अन् ह्या साऱ्या कोड्याचा सहजासहजीच उलगडा झाला मला. गोरे वकील जी गोष्ट आजपर्यंत माझ्यापासूनच नव्हे, तर साऱ्या जगापासून लपवून ठेवीत होता ती गोष्ट त्याच्या भोळ्या बायकोनें कुमूजवळ आज उघड केली होती. गोरे वकिलाच्या बायकोची शेतवाडी होती, तिला दुसरें कोणी वारस नव्हते, सालाचे तेरा-चौदाशें रुपये उत्पन्न विनमायामानें गोरे वकिलाच्या तिजोरींत नियमानें पडत होतें आणि त्याच्याच जोरावर गोरे वकील आपल्या वकिलीचा खोटा दिमाख जगाला दाखवीत. आणि माझ्यासारख्या मित्राचाहि " तूच एकटा मागें पडलास " असा काहींतरी कळत न कळत उपहास करीत, जगाची दिशाभूल करीत होता—जगाच्या डोळ्यात धूळ फेकीत होता !

## ताई : : ४

कॉलेजसमोरच एका नवीन झालेल्या इमारतीत मी राहण्यास आलो होतो. जवळ जवळ एक महिना झाला असेल, पण अजून कॉलेजच्या आवारांतहि मी कधी गेलो नव्हतो. मुलांमुलींच्या झुंडी आत जातयेत असताना मी पाहात होतो, पण माझा व्यवसाय निराळा असल्या कारणाने कुतूहलाशिवाय कसलीच कल्पना नव्हती माझ्या मनात. आठपंधरा दिवसात घरगुती जेवणास सुरवात व्हावयाची होती माझी. आणि प्रपचातील जमाखर्चाचा अंदाज वगैरे सबंधीचेच अधिक विचार चालत असत माझें त्यामुळें!

सुमारें आठ वाजतां वसत आत आला. रविवारचा दिवस होतो तो. समोरच्याच कॉलेजात इन्टरला होतो तो. आणि त्याच्या घरचा आणि आमचा पुष्कळ घरोबा आणि परिचय असल्यामुळें तो मधूनमधून माझ्याकडे तसा येत असे.

आजहि तो तसा सहजच, पण थोडासा बुद्ध्याच आला होता. साडेआठ वाजता कॉलेजच्या मागल्या पटागणात इटर कॉलेजिएट मुलींच्या सायकलच्या चढाओढी व्हावयाच्या होत्या. मध्यंतरी अर्धा

तास अवधि होता आणि म्हणून मला भेटण्याच्या दृष्टीनें व तसेंच तेवढा वेळ काढण्याच्या दृष्टीने तो माझ्या ब्लॉकमध्यें आला होता.

मी सहजच सायकलच्या चन्हाओढीसंबंधी त्याला काही प्रश्न विचारलें. त्याची उत्तरें देता देतां तो मला म्हणाला, " तुम्ही चला की, माझेबरोबर सामने पाहायला. "

सुट्टीचा दिवस असल्यामुळें मीहि नाखुषी दर्शविली नाही. मी त्याचेबरोबर सामने बघण्यास निघालो.

पटांगणात बरीच गर्दी झाली होती. सामन्यात भाग घेणाऱ्या विद्यार्थिनीच केवळ तेथें नव्हत्या, तर त्याच्याबरोबर त्याचें कौतुक करणाऱ्या त्याच्या मैत्रिणी आणि सर्व मुलींच्या जवळ जवळ दुप्पट एवढे त्याचे चाहते विद्यार्थी तेथें जमले होते. शर्यतीकरिता चुन्याच्या रेघा आखल्या होत्या, आणि दोन्ही बाजूस दोऱ्याचें कुंपण केलें होतें दोरीला खेटून एका ठिकाणी मी आणि वसंत उभे होतो आणि मुलामुलींचें हास्यविनोद, त्याच्या बालीश कोट्या वगैरे मी कौतुकानें बघत आणि ऐकत होतो.

मुलींच्या सायकलींची शर्यत हा प्रकार निदान मला तरी नवा वाटत होता शर्यतीला अजूनहि पाचदहा मिनिटें अवकाश होता. आणि तेवढ्या वेळात मी न विचारताच एकाद्या उत्साही वाटाड्या-प्रमाणें वसंत मला निरनिराळ्या गोष्टींची माहिती देत होता. बोलता बोलता त्याची वर्णनें व्यक्तीवर आली, ती इतकीं की, एक किरमिजी रंगाची साडी नेसलेली ती मुलगी फर्ग्युसनची बॅड्‌मिन्टन् चँपियन् आहे, ती पाढऱ्या पातळातली बुटकी मुलगी वाडियाची स्कॉलर आहे. मधेंच सायकल धरून उभी असलेली मुलगी आमच्याच कॉलेजची सायकल एक्स्पर्ट आहे, आणि ती ताई... "

वसंतनें बोट दाखविलें आणि धर्मसंयोग असा झाला कीं, त्या " ताईनें " आमचेकडे त्याचवेळीं पाहिलें, आणि . . .....

त्यावेळी मी पुण्याच्या गेस्ट हाऊसमध्यें राहात होतो. अमुक वेळेला मी खोलीवर भेटेनच असें त्यावेळी नक्की नव्हतें, कारण, कधीकधी [illegible] परस्परच फिरावयास जावें किंवा कधी सिनेमास जावयाचे ठरविले तर तो सपवून साडेनऊ वाजताच रात्री परत यावें. अशा तऱ्हेचा अनियंत्रित कारभार चालला होता माझा. पुण्यास नवीनच आलो होतो मी. आणि साहजिकच, गावात अगर गावाच्या आसपास जे काम [illegible] होते ते फुरसतीच्या वेळात पाहून टाकण्याचा सपाटा चालविला होता मी पहिले काही दिवस ! सांगावयाचा मतलब इतकाच की, शनिवार व रविवार हे दोन सुट्टीचे दिवस असूनहि त्या दिवशी भाडपर डॅम् वगैरे बघण्याच्या इराद्यानें मी भोरच्या एका मित्राकडे गेल्यामुळे मनोहर पुण्यात येऊन परतहि गेला तरी त्याची माझी भेट झाली नाही.

मनोहरनें माझ्या नावें एक चिठ्ठी लिहून ठेवली होती चिठ्ठी कसली पत्रच होतें ते आणि तें मी गर्दीगर्दीनें वाचीत होतो

"ज्यावेळी मला तुझी अत्यंज गरज भासली त्यावेळी तू मला भेटू शकला नाहीस. ह्या योगायोगाचा अर्थ मला नीटसा लावता येत नाही. ज्या गोष्टी प्रत्यक्ष भेटीतच [illegible] ह्व्यात, किंबहुना ज्या गोष्टी पत्रद्वारें लिहिणें तितकेसें इष्ट नाही, त्या तशा लिहिण्याशिवाय दुसरा मार्ग उरला नाही.

माझ्यावर एक प्रसंग ओढवला आहे, नव्हे, तो प्रसंग मी आपण होऊन स्वत.वर ओढून घेतला आहे. सुखाच्या संसारात बसण्याची कुणासही हौस असते. माझ्या भावी आयुष्याचे चित्र मी स्वत.पुढे रेखाटून ठेवलें आहे. आणि त्याच्या सिद्धत्यर्थ संपूर्ण संधि येईपर्यंत माझ्यावर कोणी कसलेंहि वजन पाडले तरी माझ्या कल्पनाना आणि माझ्या विचाराना माघार घ्यावी लागेल अशी कोणतीहि गोष्ट मी करणार नाहीं, हा माझा निश्चय आहे. त्याचें असें झालें

कीं, बाबाशीं गेले कांपैकी दिवस रावबहादूर मोघे नावाचे एक पुण्यातील गृहस्थ पत्रव्यवहार करीत होते. तूं पुण्यास नवीन असल्यामुळें तुला हे रावबहादुर ऐकून माहीत आहेत अगर नाहीत हें मला माहीत नाही, परंतु चारपाच वर्षांपूर्वी मोघे नावाचा एक विद्यार्थी आय. सी. एस. होऊन नागपूरला न्यायखात्यांत कोठेंतरी काम करीत आहे. आय. सी. एस. मोघे हा रावबहादूर मोघ्याचा मोठा मुलगा. रावबहादूर मोघ्याची एक मुलगी पुण्याच्याच एका कॉलेजमध्यें यंदा बी. ए. ला आहे. रावबहादूराचा आणि आमच्या बाबाचा स्नेह आहे. आणि त्या स्नेहाचेंच रूपांतर नात्यात व्हावे असा रावबहादूर प्रयत्न करीत आहेत.

मला वाटतें साऱ्या काही गोष्टींचा बोध झाला तुला आता. पण हा सारा उपोद्घात झाला. बाबानी मला [illegible] घरासंबंधी बऱ्याच गोष्टी सांगितल्या. माझ्या कल्पनाशी जुळेशा होत्या त्या. आणि बाबाचा फारच आग्रह दिसला मला ! मला सुशिक्षित मुलगी पाहिजे बाबा म्हणाले सुशिक्षित आहे ही. संपत्ति, कुलशील वगैरे सारें जें काही बाबाना पाहिजे तें आहे एकूण सर्व काही आहे. आणि अशा रीतीनें बाबाशी विरोध न करिता आपोआप सर्व गोष्टी जमून आल्या तर किती भाग्यवान मी. अशा तऱ्हेचे विचार माझ्या मनात नाहीजिकच येऊं लागले.

रविवारची सकाळची वेळ प्रत्यक्ष भेटीगांठीकरिता बाबानी मुक्रारहि करून टाकली. बाबा त्यांच्या नेहमीच्या मित्राकडे उतरावयास गेले व त्याना अमूक वाजतां अमूक ठिकाणी भेटतों व मग पुढें रावबहादूराकडे निघण्याचें कसें तें ठरवू असें सांगून मी गेस्ट हाउसमध्यें तुझ्याकडे म्हणून वळलो -पण तू तेथें नव्हतास !

मला मोठा प्रश्न पडला. बाबाबरोबर मला रावबहादुराच्या बंगल्यावर जावयाचें नव्हतें. तुझ्या सल्ल्यानें तुला बरोबर घेऊन

स्वतंत्रपणें माझ्या मनातून कुठेतरी भेटीची जागा ठरवावयाची होती –पण..

शेवटी मी विचार केला कीं, आपण एका ... घरी जाणार आहोत, की जो स्वत रावबहादूर, ज्याचा एक मुलगा आय. सी. एस. आणि ज्याची मुलगी बी. ए. च्या वर्गात शिकत होती आणि मग आपण इतकं काय भ्यायच किंवा लाजायचं !

रावबहादुराच्या बंगल्यावर ठरल्या वेळेवर बाबाबरोबर मी गेलो अखेरीस.

रावबहादूर आमची वाट तर खचित पाहात होते. "या बसा" म्हणून त्यानीं आमचें स्वागत केले "आज तुमचा मान जरा मोठा आहे – स्नेही नाही – व्याही " रावबहादूरानीं बाबाना विनोदाने म्हटले आणि एकमेकाना हा विनोद पटला अशाच मुद्रेनें जणू दोघेंहि एकदम हसले. टेबलाभोंवतालच्या खुर्चीवर रावबहादूर बाबा व मी तिघही बसलो रावबहादूरानीं मला काही प्रश्न विचारले व मीहि त्याना काही उत्तरे दिलीं, आणि त्याच्या सांगण्यावरून त्याची कन्यकाहि तेवढ्यात पुढे आली. रावबहादूराच्या सांगण्यावरूनच तिनें बाजूची एक खुर्ची ओढली व तीहि त्यावर बसली. बाबानीं मुलीस काहीं प्रश्न विचारले आणि मला तसे कोणी न सांगताहि मीहि सुरवात म्हणून त्या मुलीस काही प्रश्न विचारले, आणि त्या मुलीनें त्यावर काहीतरी मामुली उत्तरे दिली. मला वाटलें की, आम्हाला मोकळेपणाने बोलता यावं म्हणून रावबहादूर काहीं संधि देतील; पण तसे काहीच झालें नाही उलट, प्रस्तुत...चें महत्त्व माझ्यामापाने न अजमावता ते दोघे म्हातारे अगदी अप्रस्तुत गोष्टीसंबंधी बोलणी करूं लागले. खर. सांगायचं म्हणजे ते तसेंच बाजूस बोलत राहिले असते, तर मीहि त्या मुलीशी कितीतरी गोष्टी बोलत राहिलो असतो. वेळप्रसंग ओळखून तशा तऱ्हेचे

घाडसहि करण्याचा मी मनातल्यामनांत बेत करीत होतो, पण आता रावबहादूर त्याच्या त्या अप्रस्तुत गोष्टी केवळ बाबापाशीच बोलून थांबत नव्हते, तर त्याच्या प्रश्नोतरामध्यें ते मला नाहक गोवीत होते, आणि वर प्रत्येक वेळीं ते माझ्याकडून उत्तराचीहि अपेक्षा करीत होते.

मी नुसताच चुळबूळ करीत बसलो होतो. एकाद्या मुलीला ' बघावयास ' जाणें म्हणजे त्या मुलीचा अपमान करणें होय, असे माझे विचार आहेत, पण रावबहादूराच्या मुलीस बघावयास जाणें म्हणजे स्वत.चाच अपमान करून घेणें होय, हेंहि स्वानुभवानें म्हणावयाची पाळी आली आहे माझ्यावर !

मुलगी मला पाहिजे तशी अगदीं तरतरीत, ॲक्टिव्ह आणि स्मार्ट आहे अगर नाही हा प्रश्न जरी क्षणभर सोडून दिला, तरी ती दहाजणीत बरी दिसेल असे वाटतें आणि वाटत नाहीहि परिस्थिति अशी आहे की, या मुलीच्या स्वतःच्या कल्पना मला माहीत नाहीत, आणि माझे विचार अर्थातच तिला माहीत नाहींत, पण रावबहादूर आणि बाबा मात्र असें धरून चालले आहेत की, हें लग्न मुळीं जमलेलेंच आहे - फक्त तिथिनिश्चय व्हावयाचा आहे.

वधूपरीक्षेच्या आणि वरपरीक्षेच्या आपल्या पद्धतीचा निषेध करिता करिता स्वत. भलत्याच पेचात सापडलो आहे मी. पूर्व—परिचयाची संधि तर नाहीच, पण प्रत्यक्षसुद्धा किती थोडावेळ पाहिले असेल मी तिला आणि तिने मला हें गणीतच नको ! माझ्या आवडीनिवडी, तिच्या आवडीनिवडी, माझ्या आकांक्षा, माझे विचार, तिचे विचार ह्यासंबंधीं आम्हा ऐकमेकास काहींच माहिती नाहीं.. ' बॅडमिन्टन्, सायक्लिंग्, पोहणें वगैरे ज्या गोष्टींची मला अत्यंत हौस

आहे, त्या गोष्टी तिला येतात अगर नाहीत, वगैरे प्रश्न मला तिला जरूर विचारावयाचे होते.

प्रीतिविवाह शक्य नसला तरी पूर्वपरिचय किंचित् तरी होऊन मग विवाह व्हावा अशी माझी अतिशय इच्छा आहे.

गफलतीनें का होईना, पण माझ्याकडून पहिल्या प्रथम आशा दाखविली गेली, संमती दाखविली गेली, आणि ती संमती प्रत्यक्ष परिस्थिति निराळी आढळल्यानंतरहि, अशी बोकाडी बसली आहे.

रावबहादुराची मुलगी आणि आय्. सी. एस्. ची बहीण ही सुधारणेच्या बाबतीत अमूक एका मर्यादेच्या खालीं असणारच नाही, अशी स्वतःची भ्रामक समजूत करून घेतल्यामुळें हे असें झालें आहे. मी मुलगी नापसत म्हणतो असें नव्हे, पण जें काय मला दिसलं आणि जें काय मी अनुभवलं त्यावरून हें प्रकरण जर मी अंगी चिटकवून घेतलें, तर माझा संसार सुखाचा होईलच असें मला खात्रीनें वाटत नाही.

एक आणि एकच पळवाट मी काढली आहे आणि ती अशी की, [illegible] या बाबतीत होकार [illegible] अखेरचा शब्द मी देऊ शकत नाही असें सांगण्याचें मी धाडस केलें आहे.

बाबा मजवर त्यावरूनहि एकदम खूप रागावले. रावबहादूरांनी जरी तितकासा असंतोष दर्शविला नाही, तरी " तुमची तितकी मैत्रीच असली तर होऊ द्या की तसंच ! " असें काही तरी ते बोलले.

उद्या रावबहादूर तुला गेस्टहाऊसमध्यें येऊन भेटणार आहेत. मला सुट्टी नसल्यामुळें मी परत जात आहे. बाबाहि परत येणार होते, पण त्यांनी आपला बेत बदलला. माझा आपला तर्क आहे की, ते रावबहादूरांना घेऊनच उद्या तुझ्या खोलीवर येतील, त्यावेळी सावध रहा, आणि मला खालीलप्रमाणें मदत कर. ... "

माझ्यावरहि तो एक प्रसंगच होता. मी सर्व दिवसभर त्या पत्रावर विचार करीत होतो. लोक हरप्रयत्नानीं लग्नें जमवतात आणि मी ....!

आणि खरोखरीच त्या दिवशीच संध्याकाळीं रावबहादूर आणि मनोहरचे बाबा माझ्या खोलीवर येऊन थडकले मनोहरच्या वडिलांनीं माझी रावबहादूराशी ओळख करून दिली आणि ते मला म्हणाले. "तुम्ही काल नव्हता, तो तुमचा स्नेही, तेव्हा तुमचा औपचारिक होकार त्याला पाहिजे आहे. तेव्हा तुम्ही आणि रावबहादूर काय ते ठरवा ... "

मला एका दांभिक माणसाची भूमिका करावयाची होती—मला आणखी दोनतीन दिवस सवड नाहीं—मी शनिवारीं संध्याकाळीं येऊं शकेन म्हणून मी प्रथम थाप मारली-हेतु हा की, माझ्या भेटीच्या वेळीं मनोहरचे बाबा तेथें असूं नयेत—त्यांनीं पुणें सोडून निघून जावें. हो, ना करिता करिता शनिवारची संध्याकाळची वेळ मुक्रर करून ते दोघेहि म्हातारे परतले

आणि शनिवारी बरोबर पाचच्या ठोक्याला रावबहादुराच्या बंगल्याशी माझी सायकल थडकली. मनोहरनें जें टेबल आणि ज्या खुर्च्यांचें वर्णन केलें होतें, त्याच मेजाभोंवती रावबहादूराची कन्यका त्याच्या सांगण्यावरून जरा वेळानें पुढें आली आणि [illegible] बसली. त्या भेटींत माझा दुहेरी हेतु होता. मनोहरला मोकळेपणाची संधि न [illegible] तिच्या अंगी जरूर असलेले गुण त्याच्या ध्यानीं आले नाहींत किंवा तिच्या अंगीं जरूर असलेले गुण नाहींतच मुळीं, हें मला स्वतःला अजमावयाचें होतें. मध्यंतरीं गेलेल्या दोनतीन दिवसात त्यावर मी पुष्कळ विचार केला होता आणि जरी हे लग्न अंतीं आनंददायी होईल असें वाटत नाहीं, अतएव तें शक्यतो मोडलें जावें आणि तें मी मोडावें असा मनोहरच्या पत्रांत स्पष्ट

ध्वनि होता; तरीपण शेंकडा दहा टक्के मला असेंहि पण वाटत होतें कीं, पाहूं या तर खरं, आपलं स्वतःचं मत काय होतं तें !

अर्थात मनोहरच्या स्वतःच्या आशा, इच्छा, त्याचा सदर बाबतींत झालेला पूर्वग्रह आणि त्यानें मोठ्या विश्वासानें मजवर सोंपविलेली कामगिरी आणि टाकलेली जबाबदारी ह्यांची पकड नव्वद टक्के माझ्या मनावर होतीच होती !

मला स्वतःला कसलाच संकोच बाळगण्याचें कारण नव्हतें. मी स्वतः विवाहित होतो, आणि त्यामुळें अतिशय निर्भयतेनें आणि मोकळेपणानें मी बोलत होतो—स्वतः माहिती देत होतो आणि त्या बरोबर माहिती काढितहि होतो.

" बॅडमिंटन वगैरे खेळता का तुम्हीं ? सायक्लिंग, स्विमिंग.... तुम्ही काय पुण्यांतल्या मुली....." मी सूचक प्रश्न टाकला. हें कांहीं येत नसलें तरी तें आपणांस यावें असें तरी तिला वाटतें किंवा नाहीं हें मला अजमावयाचें होतें.

ती वर्गांत सदा हुषार मुलगी म्हणून गणली जात होती. तिला एकदोन शिष्यवृत्त्या मिळत होत्या हेंहि तिच्याच तोंडून मला कळलें होतें आणि साऱ्या गोष्टींचा सांगोपांग विचार करतां माझें स्वतःचें प्रामाणिक असें मत तयार झालें कीं, पण त्या मताचा उगीच बोभाटा न केला तर बिघडलें कोठें ?

एवढं मात्र नक्की कीं, त्या दिवशीं रावबहादुरांबरोबर नानाविध विषयावर अगदी अघळपघळ, एखाद्या पंडितासारख्या मी इतक्या कांहीं गप्पा मारल्या कीं, रावबहाद्दुर आणि मी कांहीं वेळ संभाषणांत अगदीं रंगून गेलों होतो. मी ज्या कामाकरितां रावबहादुरांच्या घरीं गेलों होतों, त्या बाबतींत स्वतःचें अनुकूल मत झालें असल्यामुळेंच संभाषणाला इतका मोकळेपणा आला आहे असें रावबहादुरांना त्यावेळीं साहजिकच वाटलें असेल.

" बरं, येतों मी आतां...." मी म्हटलें.

" ठीक आहे....मग फारशी कांहीं अडचण आता राहिली आहे असें वाटत नाहीं....पैशाच्या बाबतींत तर...."

पैशाच्या बाबतींत ? मनोहरचीं मतें मला पूर्ण माहीत आहेत.... पैशामुळें लग्न मोडलं ही कल्पनासुद्धां सहन व्हायची नाहीं त्याला....पण तशा तऱ्हेची शंका घ्यायला तुम्हांला काय कमी आहे हो ? " मी अखेरीस हंसत हंसत जरा विनोदानें म्हटलें.

" तसं नाहीं हो! " रावबहादूरहि जरा हंसले.

" मग आम्हाला पत्र केव्हां येईल ? " रावबहादूरांनीं पृच्छा केली.

" येईल तीनचार दिवसात मी त्याना माझं मत लिहीन आणि मग त्यांच्याकडून तुम्हांला रीतसर पत्र येईल....अहो. कांहीं झालं तरी सगळीं मतें गोळा करून अखेरचा निर्णय ज्याचा त्यानेंच द्यायचा असतो असं नाहीं का ? " मोठ्या मानभावीपणाचा आव आणून मी म्हटलें.

" तें तर खरंच. .पण मुहूर्त वगैरेहि कांहीं थोडा बघितला पाहिजे. ..आमच्या मनांतून शक्य तो येत्या नवमीचा मुहूर्त गांठायाचा आहे. तेव्हां म्हटलं तुम्हीं शक्य तों लवकर सारं जमेल असं करा. .. "

" येस. येस ...." म्हणून मी पायऱ्या उतरलों.

जातां जातां मी मागें वळून पाहिलें. रावबहादूरांचा चेहरा अत्यंत प्रसन्न दिसला मला, आणि त्यांच्या त्या मुलीचा....जीविताच्या निश्चितीचा आनंद डोळे, तोंड आणि नाक वगैरे दृष्य इंद्रियांवर स्पष्ट दृग्गोचर आलेला भासला मला !

* * *

मी जें काय केलें ते एक सत्कृत्य कां कृष्णकृत्य ह्याचा बरोबर मेळावा मला अद्यापपर्यंत लावतां येत नाहीं. मी साऱ्या गोष्टींचा सांगोपांग विचार केला. कोणाचें 'जुळतें लग्न मोडूं नये ही जरी रूढी असली तरी मी अखेरीस मनोहरच्च्याच मदतीला धावलो.

" माझें स्पष्ट आणि प्रामाणिक मत पाहिजे असेल तर मला मुलगी पसंत नाहीं," असें खरेंखोटें कांहींतरी एक उत्तर मी मनोहरला पाठविलें.

पुढें व्हावयाचें तेंच झालें. माझें अशा तऱ्हेचें पत्र आल्यानंतर तें पत्र पुढें करून मनोहरनें आपल्या वडिलांना आपला नकार कळविला. मनोहरचे वडील त्याच्यावर नव्हे तर माझ्यावर खूप नाराज झाले. " तुझ्या लग्नाच्या बाबतींत यापुढें आतां कानाला खडा ...तुझा मित्र आणि तूं........" अशा तऱ्हेचे रागाचे उद्‌गार मनोहरच्या वडिलांनीं काढले वाटतं; आणि रावबहाद्दूरांना मग केव्हांतरी आश्चर्याचा धक्का देणारें पत्र त्यांनीं लिहून टाकलें !

मनोहरच्या वडिलांच्या रागाची मला फारशी पर्वा नव्हती. रावबहाद्दूरांच्या इतराजीसंबंधीं अधिक विचार करण्याचें मला कांहींच प्रयोजन नव्हतें; पण एक गोष्ट मात्र मला सारखी लागून राहिली होती कीं, एका निष्पाप मुलीचा मात्र आपण घनघोर अपराध केला आहे. तिलाहि सुखाचा संसार पाहिजे होता. रावबहाद्दूरांनीं व मनोहरच्या वडिलांनीं तिला आशा लाविली होती आणि त्या दिवशीं मी मनांतील कोणताहि भाव प्रकट न करितां अमृताचा पेला तिच्या अधिकच जवळ येत आहे असेंच तिला भासविलें होतें. माझी भूमिका मित्रसाहाय्य करण्याची असली तरी एका मुलीशी मी कपटाचरण केलें होतें. सर्व दोषांचें खापर स्वतःच्या माथीं फुटत होतें तरी तेंहि सहन करण्यापर्यंत मनाची मजल नेऊन मी मित्राला पाठीशी घालून त्या मुलीचा मी खेळ केला होता !

मनांतल्या मनांत केवढा हेवा, द्वेष आणि तिरस्कार ती करीत असेल माझा ! पुढेंमागें तिचें कोणाशी तरी लग्न होईलच होईल— ती सुखी होईल–पण कांहीं झालें तरी तिचें माझ्याबद्दलचें मत.... !

* * *

वसंत सांगत होता आणि मी ऐकत होतो—“ ही आमच्या कॉलेजची ताई. हिला सर्व लोक ताई म्हणतात. ही कधीं कोणाशीं बोलावयाची नाहीं; कधीं कोणत्या चढाओढींत भाग घ्यावयाची नाहीं, नेहमीं आपलीं पुस्तकें आणि आपला अभ्यास; त्याबाहेर उद्योग नाहीं तिला, अशी आजपर्यंत तिची आख्यायिका होती. पण यंदा-पासून काय झालें न कळे, बॅडमिंटन् काय, स्विमिंग काय, एकदम खेळाला आणि शिकायला सुरवात केली आहे तिनें. तिच्या आकृती-वरून आणि वागण्याच्या पद्धतीवरून ती जें काय करीत असते तें सगळें कृत्रिम कृत्रिम दिसतें हें निर्विवाद ! अकालीं प्रौढत्त्व किंवा प्रौढपणीं बालिशत्त्व अशा तऱ्हेचें कांहींतरी संमिश्रण झालेलें आहे तिच्या वागणुकींत! पण ती अलीकडे आपण होऊन पुस्तकाबाहेरच्या जगांत भाग घेण्याचा प्रयत्न करतांना दिसते. निर्विवाद....अशी ही आमची ताई आहे. .... .... ! ”

वसंतनें जरा वेळापूर्वी बोट दाखविलें होतें. ताईची नजर आम्हा-कडे .... माझ्याकडे तेव्हांच लागली होती. तिनें मला पाहिलें होतें—नव्हे चांगलें ओळखलें होतें. आणि हेंच मला फार जाणवत होतें. एव्हाना शर्यतीला केव्हांच सुरवात झाली होती. शर्यत तीहि बघत होती आणि मीहि बघत होतो; पण दोघांचेंहि लक्ष शर्यतीकडे मुळींच नव्हतें–खचित खचित, एकमेकांकडे होतें....

× × ×

अन् पुढें कितीतरी वेळां आमची नजरानजर होण्याचे प्रसंग आले असतील, पण अशा प्रत्येक वेळीं मनांतली खळबळ मनांतच दडपून बाहेर कसलाहि भाव दिसूं देत नाहीं मी; परंतु आयुष्याच्या प्रवासांत कुणाचे, केव्हां आणि कसे संबंध येतात आणि कोणच्या स्वरूपांत, विसरण्यास अशक्य अशा अवस्थेंत ते राहूं शकतात, ह्यासंबंधीं विचार येऊन मन किंचित् अस्वस्थ, बेचैन होऊन जातें !

# न फेडलेलें कर्ज : : ५

नोकरीच्या इतक्या थोड्या अवधींत बरची जागा मिळाल्याबरोबर माझ्या पेहरावांत व टापटिपींत जो बदल घडून आला तो अगदीं साहजीक आणि क्रमप्राप्तच होता. आतां मी नियमानें सूटबूट वापरीत असें. उपनगरांतून मुंबईस रोज कामावर जाण्याकरितां जो रेल्वेचा लेखी परवाना म्हणजे ' पास ' लागत असतो, तोहि दुसऱ्या वर्गाचा काढून पंख्याखालीं गादीवर रेळून प्रवास करणें उपभोगूं लागलों होतों मी अलीकडे.

पासाच्या मुदतीची अखेरीची तारीख कालच संपली होती. पुन्हा पैसे भरून नवा पास काढायला आज अगदीं पाहिजेच होता. पण खेळाला आज जरा विशेषच रंग चढल्यामुळें कोर्टावरून परतण्यास मला बराच उशीर झाला. स्नान करून जेमतेम चार घांस पोटांत कसेतरी ढकलले मात्र....स्टेशनवर पोंचतो तो गाडीला सिग्नलहि मिळालेला दिसला.

गार्डी हलली नि मग मला आठवण नव्हे जाणीव झाली कीं, नवा पास काढायचा राहिलाच अखेरीस! मनांतल्या मनांत जराशी

भीतीच वाटली; कारण, जरी जुन्या पासावर दडपून प्रवास करणें तितकेसें अशक्य नव्हतें, किंबहुना माझ्यासारखे कितीतरी लोक चुकून नव्हे तर बुद्धिपुर:सर मुदत संपलेल्या पासावर प्रवास करून महिने-महिने रेल्वेखात्याला फसवतात, ही गोष्ट जरी मला माहीत होती, तरी स्वत:वर प्रसंग आल्याबरोबर मात्र फसवेगिरीशीं न निढावलेलें माझें मन जरा घाबरून गेलें.

पण आज कोणी आपला पास बघायला मागणार आहेच का? अन् मागितला तरी तो एवढा वाचून पाहणार आहे का? स्वत:स अनुकूल असेच निर्णय घेत असतो माणूस अशावेळीं....एक दोन मिनिटांतच माझी विचारसृष्टि पालटून गेली....दुसऱ्या कसल्यातरी गोष्टींची कल्पनाचित्रें समोर सरकूं लागलीं माझ्या.

पायांतील बुटांकडे माझी नजर गेली. आजच्या धांदलींत मोठेंच एक काम राहून गेलें होतें. तीनचार दिवसांत बुटांना पॉलीश मिळालें नव्हतें अन् आदल्या दिवशीं धुळीच्या एका रस्त्यांतून थोडी चाल झाल्यामुळें तर बुटांना अगदींच मलीनता आली होती. घरून निघतांना घाईघाईनें मारलेल्या फडक्याचा कांहींच उपयोग झाला नव्हता....अन् अशा अस्वच्छ बुटांनीं आज ऑफिसमध्यें वावरायचं....कसंसंच वाटूं लागलं मला तें.

पुढच्या स्टेशनवर गाडी उभी राहिली. मी बाहेर डोकावलें. बूटपॉलीश, बूटपॉलीश....पाहिजे असलेला मनुष्य पाहिजे त्या वेळीं समोर हजर राहणें हें एक भाग्याचेंच लक्षण....खरोखरीच एक बूटपॉलिशवाला पोरगा स्टेशनच्या फलाटावर जवळच उभा असलेला दिसला मला.

काळासांवळा, अस्वच्छ कपडे घातलेला पण किती गोंडस आणि गोजिरवाणा दिसत होता मुलगा तो! वयाची केवळ दहाबारा वर्षेंहि अजून उलटलीं नसतील....जगांतील कोणत्याहि तऱ्हेच्या

ज्ञानाची पैदास न करतां माणसामाणसांचे पाय धरून, त्यांच्या बुटांनां चकाकी आणून, इतक्या लहान वयापासूनच हा मुलगा जीवनाचा खटाटोप, जगण्याची धडपड करीत आहे....सारा जन्म दुसऱ्यांचे बूट स्वच्छ करीत राहणें हेंच का त्या पोराचें कर्तृत्व आणि जन्माला आल्याचें सार्थक ? क्षणभर स्वतःच्या बुटासंबंधीची आतुरता विसरून त्या मुलाच्या जीवनासंबंधीचे विचार आले माझ्या मनामध्यें.

पण तरीहि, उच्चवर्गीय रुबाबांतच मी दोन अलड टाळ्या वाजवून त्याला नुसती खूण केली. वयाला साजेशा अल्लड बालिशतेनेंच डब्याजवळ येऊन "काय साहेब" म्हणून त्यानें पृच्छा केली.

"पॉलीश कर, चल."

तो मुलगा वर चढण्यास नाखूष दिसला जरा. गार्डानें गाडी सुटण्याचा इषारा दिला–गाडी हलली तरी तो पोरगा फलाटावर नुसता उभाच. मला त्याचा राग आला आणि मी त्याच्या अंगावर जरा ओरडलोच—"अरे! चढ कीं!"

अन् मग तो चटकन् तेवढ्यांत चढलाहि.

मोठ्या कलावंताची ऐट आणून त्यानें आपल्या कामास सुरवात केली. एकीकडे टाइम्स वाचतांवाचतां मीहि त्याला जरा जिज्ञासेनेंच कांहीं मामुली प्रश्न विचारूं लागलों.

"तूं शाळेंत जात नाहींस कारे ?"

"काय करायची शाळा ?"

"मग, सारा दिवस पॉलिश करीत फिरतोस फक्त ? किती पैसे कमावतोस रोज रे ?"

"काय मिळणार ? चारपांच आणे मिळतात अख्खा दिवस हिंडून....अन् तेंहि एखाद दिवशीं मिळाले नाहींत कीं...."

" कीं काय ? "

" काका जेवायला घालायला खटखट् करतो ना. " तो पोरगा एकदम बोलून गेला.

पण त्या पोराच्या त्या एकाच वाक्यानें त्याच्या जीवनासंबंधीचा केवढा मोठा आणखी प्रकाश पडला माझ्या मनामध्यें !

पुढचें स्टेशन जसजसें जवळ येऊं लागलें, तसतसा गाडीचा वेग कमीकमी होऊं लागला. अन् एक गोष्ट माझ्या ध्यानांत आली कीं, तो पॉलिशवाला आपलें काम जास्तीच गडबडीनें उरकूं लागला. मला आवडलें नाहीं तें. पुढच्या स्टेशनवर उतरून दुसऱ्या डब्यांत जाऊन दुसरीं गिऱ्हाइकें मिळवायचीं असतील त्याला, पण म्हणून घेतलेलें काम जरा शांत आणि चोखपणें करायला नको का ?

अन् म्हणून मी त्याला जरा दटावूनच म्हटलें—

" गर्दी फार केलीस अन् काम चांगलं झालं नाहीं तर पैसा देणार नाहीं हं....."

" गर्दी नाहीं साहेब " अन् तरी तो गर्दी करीतच होता. मला आश्चर्य वाटलें. कारण तेवढ्यांतच मधून मधून तो खिडकीकडे वा दरवाजाकडे बघे आणि त्यावेळीं त्याच्या चेहऱ्यावर कांहींतरी घाबरटपणाच्या छटा उमटलेल्या दिसत.

गाडी थांबली. त्या मुलाचें सारें काम एव्हाना संपलें होतें. चटकन् त्यानें दोन्हीहि बूट माझ्यापुढें ठेवले, डबी, ब्रश, वगैरे हातांत उचलून घेतला आणि मोबदल्याची—एका दिडकीची—अपेक्षा करीत तो गुडघ्यावरच अर्धवट उभा राहिला .... पण इतक्यांत....

पांढरा युनिफॉर्म घातलेला एक इसम डब्यांत शिरला. पोराची आणि नवागत मनुष्याची नजरानजर झाली. दोघांच्या डोळ्यांची बुबुळें बाहेर येऊं बघतात कीं काय, असा मला भास झाला....

एकाची रागानें व दुसऱ्याची भीतीनें ! मांजर–उंदराचीच दृष्टादृष्ट ती ! नवागत मनुष्य रेल्वेचा तिकीट तपासणारा अधिकारी होता.

मी स्वप्नसृष्टींत होतो का सत्यसृष्टींत अन् त्यांतल्यात्यांत विसाव्या शतकांतील सुधारलेल्या सृष्टींत होतों हें कळेना मला. त्या इन्स्पेक्टरनें त्या मुलाच्या हातांतील ब्रश आणि पॉलिश डबी प्रथम हिसकावून घेऊन ती दरवाजाबाहेर फेकून दिली अन् दुसऱ्या क्षणींच त्या मुलाची मान धरून त्यानें त्याच्या कोवळ्या कोवळ्या गालावर दोनतीन हात जोरानें ओढले !

क्रौर्य ! निर्दयता ! कुठून शिकतात माणसं हे गुणधर्म ?

' चल....हो बाहेर....' थरथर कांपत आणि एकीकडे डोळ्यां-तून अश्रू टाकीत तो पोरगा गाडीच्या बाहेर उतरला.

' बारा आणे आहेत ?' इन्स्पेक्टरनें पोराला विचारलेलें मी ऐकलें.

' नाहींत साहेब....जाऊं द्या ना एकवेळ....' त्या पोरानें इन्स्पे-क्टरचे पाय धरले.

पण, त्या इन्स्पेक्टरला कांहींहि कींव आल्यासें दिसलें नाहीं. कर्त-व्याची जाणीव त्याच्यांत अधिक होती का खाजगी कमाईच्या लालसेपुढें त्याक्षणीं दया दुय्यम ठरत होती न कळे ! पण, इन्स्पे-क्टरनें गेटवरच्या तिकीट कलेक्टरला खूण केली—' बारा आणे वसूल कर हरामखोराकडून'–आणि त्या पोराला तिकीट कलेक्टरच्या ताब्यांत देऊन इन्स्पेक्टर पुन्हा माझ्या डब्याकडे येऊं लागला.

इन्स्पेक्टर प्रथम माझ्या डब्यांत शिरला तेव्हांपासूनच माझ्या मनाची मोठी चमत्कारिक स्थिति झाली होती. मंत्रमुग्ध नागासारखा मी सारें पहात होतो. केवढा मोठा भीतीचा कोलाहल माजला होता माझ्या मनामध्यें ! त्या पॉलिशवाल्या पोराजवळ रेल्वेचें तिकीट वा पास नव्हता. शक्यच नव्हतें तिकीट वा पास काढणें

त्याला. पास वा तिकीट न काढतांच त्याला चार–पांच आणे मिळत होते. तेवढ्यांतहि त्याचा काका त्याला पोटभर खायला घालण्यास खुषी नव्हता, म्हणून त्या पोरानें नुकतेंच सांगितलें होतें. अन् म्हणून अशा परिस्थितींत तो पोरगा चोरून-मोरून गाडीं-तून हिंडून स्वकष्टानें दिडकी-दिडकी कमावूं पहात होता, आणि त्या अपराधाबद्दल त्याला हें शासन झालें होतें, होत होतें. अन् मी.... मी तर स्वतः आज मुदत संपलेल्या खोट्या पासावर प्रवास करीत होतों. ज्या ज्या क्षणीं त्या मुलाबद्दल मला अनुकंपा वाटत होती, त्या त्या क्षणीं माझी स्वतःची भीतीनें गाळण उडाली होती !

डब्यांत शिरून इन्स्पेक्टर माझ्याकडेच येऊं लागलेला बघितल्या-बरोबर तर माझ्या हृदयाचे ठोके जरा जास्तींच जोरानें मागेपुढे होऊं लागले. आपला पास आतां पहाण्यास मागितला जाणार.... आपण मुदत संपलेला पास दाखविला काय किंवा आपण विनतिकी-टानें प्रवास करीत आहोंत म्हणून बहाणा केला काय ? आपणाला दुप्पट आकारानें पैसे हे भरावे लागणारच—मी पैसे भरण्यास नाखुष वा असमर्थ होतो अशांतला भाग नव्हता; पण सुशिक्षित आणि नियम समजाणाऱ्या माणसावर अशा तऱ्हेनें पैसे भरावयाची पाळी येणें ही मोठी नामुष्कीची आणि अपमानाची गोष्ट होती आणि त्या कल्पनेनेंच मी मनांतल्या मनांत अत्यंत बेजार होऊन गेलों होतों.

इन्स्पेक्टर माझ्या अगदी नजीक आला....पण आश्चर्याची ही कीं, गोष्ट, त्यानें माझें तिकीट विचारलेंच नाहीं. उलट तो माझ्या शेजारीं बसूनच राहिला आणि....

इन्स्पेक्टरचें सारें लक्ष गेटवरच्या तिकिट-कलेक्टरकडे होतें. तो बूटपॉलिशवाला पोरगा आतां त्या तिकिट-कलेक्टरची याचना करीत उभा होता.

अन् ह्यापुढं त्या इन्स्पेक्टरनें आपण होऊन माझ्याशीं बोलण्यास सुरवात केली— " ....फुकट प्रवास करायला पाहिजे सगळ्यांना, आणि त्यांतल्या त्यांत हीं पॉलीश पोरं तर मोठी लोचट असतात. लेकांना चांगलं फटकावून काढलं पाहिजे....निदान सेकंडमध्यें तरी तुम्हीं उपद्रव देऊं नका म्हणून हजार वेळां एकेकाला दम भरला असेल, पण ऐकतील तर हराम..."

मी कांहींच उत्तर दिलें नाहीं. नुसताच थोडेसें हसण्याचा अभिनय केला. कारण पॉलिशवाल्या पोरानें गाडीच्या वरच्या वर्गांत शिरणें म्हणजेसुद्धां त्यांत बसणाऱ्या देवलोकांनां उपद्रव करणें होय! तिसऱ्या वर्गांत तशा तऱ्हेचा उपद्रव झाला तरी एकवेळ चालेल, हा त्याचा माणसामाणसांमधील उच्चनीचत्व दाखविणारा अभिप्राय मला कसासाच वाटला; अन् दुसरं असं कीं, ज्या फुकट प्रवास करणारांवर इन्स्पेक्टर टीका करीत होता, त्यांतलाच मी एक आज होतों. खरं म्हणजे, तो पॉलिशवाला पोरगा सेकंडमध्यें आधीं शिरतच नव्हता, मी त्याला जरा जबरीनेंच आंत बोलावलें होतें....त्याच्या आजच्या हालांबद्दल जबाबदार बहुतांशीं मीच होतों....पण मला कोणी पकडीत नव्हतें अन् त्या मुलाला मात्र....

इतक्यांत गाडी हलली ... मला जास्तीच खेद वाटूं लागली. कारण त्या मुलाला रेल्वेच्या अधिकाऱ्यांनीं पकडला होता म्हणून तर मला हळहळ वाटतच होती; पण त्याहिपेक्षां त्यानें माझ्या बुटांना दिलेल्या उजळ्याचा मोबदला एक पैसा कां होईना, पण तोहि मी त्याला देऊं शकलों नव्हतो!

गाडीला वेग आला — त्या मुलाची तिकिट-कलेक्टरबरोबर याचना अजून चाललीच होती, अन् तो मुलगा, तो तिकिट-कलेक्टर, तें स्टेशन सारें कांहीं अर्ध्या मिनिटांत अदृश्य झालें. जवळ

बसलेला इन्स्पेक्टरहि कुठेंतरी आणि केव्हांतरी उतरून गेला, पण माझें तें एक पैशाचें कर्ज न फेडलेलेंच राहिलें !

फुकट वा खोट्या पासावर मी अनेक वेळां प्रवास केला असेल. स्वतःच्या हातांत असलेला कागद, ट्रॅममध्यें आधींच काढलेलें तिकीट समजून ट्रॅम-कंडक्टर मागें गेला तर त्याला परत बोलावीत न बसतां एक आणा न भरतांच ट्रॅममधून फुकट प्रवास झाला असेल माझा. अनेक माणसांची वा संस्थांची अशा तऱ्हेची झालेलीं किरकोळ कर्जें अर्थात कधींच फेडली नाहींत मी—फेडायचा प्रयत्नही केला नाहीं, अन् तीं न फेडलेलीं राहिल्याबद्दल कधीं दिक्कतहि वाटली वा वाटत नाहीं मला; पण त्या बूट-पॉलिशवाल्या मुलाचें द्यावयाचें राहिलेले एक पैशाचें कर्ज........

कितीतरी दिवस झाले आतां त्या गोष्टीला. इन्स्पेक्टरांचे मार खातां खातां तो मुलगा आतां मोठा झाला असेल—ओळखणार नाहीं त्याला मी कधींहि....कोणीहि पॉलिशवाला पोरगा दिसला कीं, त्या मुलाची ती केविलवाणी मुद्रा माझ्या डोळ्यासमोर उभी राहतें आणि आठवणीनें मन जरा गुदमरून जातें.

# निनावीं पत्रें : : ६

निनावीं पत्र लिहिणें हें एक भ्याडपणाचें लक्षण आहे. काय बोलायचें असेल आणि करायचें असेल तें उघड उघड बोलण्याची आणि करण्याची माणसानें भीति काय म्हणून बाळगावी, हें तत्त्व मला अगदीं मान्य आहे. एवढेंच काय, पण अशा तऱ्हेचें एक निनावी पत्र लिहून निष्पाप हृदयांना नाहक ताप देणाऱ्या एका इसमास हुडकून काढून त्याचा खाजगिरीत्या इन्साफ करून तें पत्र तसें लिहिल्याबद्दल मला लाज वाटते असें त्याला म्हणावयास लावायचा उपक्रमहि केला आहे मी एकदां.

आणि असं आहे तरीसुद्धां मी स्वतः तें निनावीं पत्र लिहिलें आणि पोष्टांत टाकलेंहि! आणि मग मात्र, मी स्वतःशींच विचार करूं लागलों कीं, जी गोष्ट नैतिक गुन्हा आहे म्हणून आपण प्रतिपादतों आणि जी गोष्ट केल्याबद्दल आपण दुसऱ्यास शिक्षा करण्यास धांवतों, तीच गोष्ट आणि तोच गुन्हा आपण स्वतः आणि चुकून नव्हे तर बुद्ध्या समजून-उमजून केला नाहीं का? पण, आतां काय—बाण तर सुटला होता—व्हायचें तें होऊन गेलें होतें.

आज उणीपुरी वीस वर्षें आम्हीं पुण्यास एकाच घरांत राहात आहोंत एकाच घरास इतका दीर्घकाल चिकटून राहणें ही काय साधी गोष्ट नाहीं. अधुनिक पद्धतीच्या अनेक इमारती हवेशीर जागेंत रोज बांधल्या जात असतांना व सांपत्तिकदृष्ट्या अधिक चांगल्या जागेंत राहाण्यास जाणें आम्हांस आतां अशक्य नसतांनाहि आम्हीं अजून त्याच जागेंत राहात होतो. ह्याला कारणेंहि तशींच होतीं. पहिलें म्हणजे, आमचे मालक इतर मालकांप्रमाणें धनलोभी नव्हते. वडिलार्जित संपत्तीच्या आयत्या बिळावर नागोबा होऊन बसणाऱ्या बऱ्याच मालकांना आपण "मालक" आहोंत ह्याचीच घमेंड असते. मालक आणि बिऱ्हाडकरू ह्यांचे संबंध मैत्रीचे आणि सलोख्याचे असायला पाहिजेत. आपणांस जें भाडें मिळतें, त्यापैकीं निदान पावपट तरी भाडें कर, स्वच्छता, दुरुस्ती, रंगरोटी वगैरेकडे आपण खर्चिलेंच पाहिजे ह्याची त्यांना जाणीवच नसते. पण आमचे मालक ह्याला संपूर्ण अपवाद होते. ते केव्हां केव्हां विनोदानें म्हणत कीं बिऱ्हाडकरू हेच खरे जागेचे मालक.

दुसरें कारण असें होतें कीं, एकाच जागेंत बरेच दिवस माणूस राहिला कीं, तेथील अपुरेपणा आणि अडीअडचणी ह्यांचाहि त्याला एक प्रकारचा जिव्हाळा वाटूं लागतो म्हणतात. वडील म्हणत कीं, आपण इतके दिवस येथें काढले, इथल्या प्रत्येक बाबीशीं आपण एकरूप झालो, आतां मी आहे तोंपर्यंत कशाला उगीच हलवाहलवीचा उपद्व्याप करायचा? बरे आहोंत आपण येथेंच....! मला त्यांची ती कुपमंडूकवृत्ति खरोखरी पसंत नव्हती; पण म्हटलें कीं, कशाला करा त्यांना उगीच विरोध आणि नाराज?

टेनिसनच्या ओढ्यासारखीच आमची स्थिति होती. कोणी येवोत कोणी जावोत, ओढा वाहातच असतो. माझ्या आठवणींत किती बिऱ्हाडें आलीं आणि गेलीं! पण आम्ही तेथेंच होतो.

नाहीं म्हणायला आमच्या आधींचें नव्हे, पण आमच्या बरोबरीचेंच आणखी एक बिऱ्हाड त्या वाड्यांत होतें. वाडा म्हणजे इतर वाड्यांसारखाच ! मधें एक प्रशस्त चौक आणि त्या भोंवतालीं वर आणि खालीं मिळून सुमारें पंधरा सोळा बिऱ्हाडकरूंची सोय. एकदां बिऱ्हाड आलें कीं, त्याला तेथून स्वखुषीनें जाववत नसे. जीवनांतील हालचाली आणि प्रवास हा कोणासच सुटलेला नाहीं. स्थलांतरच करायचे प्रसंग आले कीं गृहांतर क्रमप्राप्तच होत असे.

तें दुसरें जुनें बिऱ्हाड म्हणजे बाघ वकिलांचें ! बाघ वकील, आमचे वडील व घराचे मालक हे एकाच वयाचे ! एका काळीं त्या तिघांचे एक नमुनेदार त्रिकूट होतें म्हणून प्रसिद्धि होती म्हणतात.

बाघ वकिलांचें बिऱ्हाड अजून होते खरें, पण तें एका वकिलाचें बिऱ्हाड होतें ह्याची आतां कुणास फार माहितीहि नव्हती. कारण, बाघ वकील केव्हांच म्हणजे जवळ जवळ १५–१६ वर्षांपूर्वीच मयत झाले होते. बायको आणि लहान लहान मुलें ह्यांनां एकटेच सोडून त्यांनीं जगाला रामराम ठोकला होता.

वासू त्यावेळीं ६, ७ वर्षांचा असेल. तो तरतरीत होता; पण परिस्थिति प्रतिकूल होती. वाघ वकील वारले, त्यावेळीं त्याचेजवळ दमडीहि शिल्लक नव्हती. वासूची आई प्रसंग ओळखून होती. मुलांची जबाबदारी आणि अन्नें दिवस काढणें—मायदेवांनीं आमच्या संसाराचे एका कवितेंत मोठें मार्मिक वर्णन केलें आहे—

न जो बारावें वर्ष तोंच लग्न
मुलें बाळें वैधव्य आणि विघ्न
पिलें पोसावी भरूनि पोळपाट
ह्यास आम्ही संसार नांव देत ।

वासूच्या आईचा संसार पाहूनच हें चित्र मायदेवांनीं चितारलें असणुं !

वासूची आई दुसऱ्याच्या घरचीं कामें करी. वासूच्या बहिणी घरकाम बघत आणि वासूनें कुठें पुजेला जावें, कुणाची फुलें आणून द्यावीं, मिळालेल्या दिवशीं वारावर जावें अन् बाकीच्या दिवशीं माधुकरी आणून द्यावी अशा तऱ्हेचें जीवन तो कंठीत होता.

पहिल्यापासूनच निदान थोडें व्यक्तित्व आल्यापासून आणि थोडें समजूं लागल्यापासून मला वाघ कुटुंबाबद्दल कळकळ आणि हळहळ वाटायची. अर्थात् जोंपर्यंत मी मिळवता नव्हतो तोंपर्यंत मला प्रत्यक्ष अशी मदत कुणालाच करता आली नसती. इतर रीतीनें जी मदत करणें शक्य असे, ती मदत मी करीतच असे. वासू अभ्यासांत शंका विचारायला यावयाचा आणि मी मोठ्या आनंदानें आणि हौशीनें त्यांचें निरसन करावयाचें. मला वाटे कीं, त्याला जर का संधि मिळाली तर तो नक्कीच नांव काढील....

वासू मॅट्रिक झाला. कॉलेजमध्यें जाण्याची त्याला हौस नव्हती असें नव्हे! एवढेंच काय, ह्याची त्याची मदत घेऊन त्याला आपला शिक्षणक्रम चालूं ठेवणें शक्यच नव्हतें असें नव्हे; पण त्याला आतां चांगलें समजूं लागलें होतें. जबाबदारीची जाणीव झाली होती त्याला .... आपल्या आईनें इतकीं वर्षें कष्टांत काढून आपणांस वाढविलें. आपल्या बहिणींचीं लग्नें व्हावयाचीं आहेत .... तें कांहीं नाहीं, आपण ह्यापुढें शिकत राहिलों तर आपण कर्तव्य विसरलो असें होईल. आपली आई, आपल्या बहिणी ह्यांचे सुख आपण प्रथम पाहिलें पाहिजे, त्यांच्या सुखापुढें आपलें सुख दुय्यम — वासू कॉलेजमध्यें गेला नाहीं, त्यानें स्थानिक शाळेमध्यें नोकरी धरली.

मॅट्रिक मास्तरला पगार तो किती मिळणार? पण त्यानें मनाचा मेरू केला, दिवसांतून तीन शिकवण्याकरून त्यानें घरच्या खर्चाची व्यवस्था केली — वासूची आई आतां दुसऱ्याच्या घरीं कामें

करीत नसे — तिचा मुलगा मिळवता झाला होता. जबाबदारीचा आर्थिक भार आतां त्यानें आपल्या शिरावर घेतला होता.

वासूला बुद्धि असून कॉलेजमध्यें जातां आलें नाहीं म्हणून मला जरा वाईटच वाटे. त्यासंबंधीं माझें त्याचें एकदोनदां मोकळे-पणानें बोलणेंहि झालें होतें. त्या बोलण्यामध्यें त्यानें त्याच्या कल्पना आणि भावना ज्या समजावून सांगितल्या होत्या त्यावरून त्यानें केलेल्या स्वार्थत्यागाचें मला कौतुकच वाटत असे.

पुढें एकदोन वर्षांत त्यानें आपल्या एका बहिणीचें लग्न उरकून टाकलें; दुसरी अजून त्या मानानें लहान होती; तिचें लग्न आणखी एकदोन वर्षें झालें नाहीं तरी चालण्यासारखें होतें — अर्थात् आतां साहजीकच त्याच्या लग्नाचा प्रश्न निघाला.

सूनमुख पाहण्याची उत्तरवयांत कुणाहि बाईला आतुरता असते. त्याचेंहि आतां लग्नाचें वय झालें होतें. आईचा आग्रह, स्वतःचें तारुण्य....तो लग्न करण्यास तयार झाला.

लग्नास तयार होणें म्हणजे लग्न होणें नव्हे. आज इतकीं वर्षें त्याच्या आईनें दुसऱ्याच्या घरीं कामें करून दिवस काढले होते हें सर्वांस माहीत होतें.

त्याला आतां पैसे मिळत होते, पण तें कांहीं पुरेसें होतें असें नव्हे— तो अपुऱ्या पैशांची भरपाई करण्याकरितां काय धडपड करीत होता हें सर्वांस दिसत होतें. पहिल्या बहिणीला लग्नाप्रीत्यर्थ थोडी फार उसनवारीहि त्याला करावी लागली होती, आणि त्याची परत-फेड हप्ता हप्त्यानें तो हल्लीं करीत होता. त्याची तो स्वतंत्र कमाई करीत होता—पैसे मिळवीत होता—पण त्याची सांपत्तिक स्थिति समाधानकारक असणें शक्यच नव्हतें. त्याच्या आईनें जरी वासूचें लग्न उरकून टाकण्याचा बेत केला होता आणि त्याला वासूनें संमती

दिली होती, तरी तसें झाल्याबरोबर दाराशीं मुलींची रीघ लागणें ही गोष्ट त्याच्या बाबतींत तितकीशीं शक्य नव्हती.

कर्मधर्मसंयोग असा झाला कीं, ह्याच सुमारास अचानक माझी मुंबईस बदली झाली. शाळा, कॉलेज, नोकरी सारें कांहीं आजपर्यंत पुण्यास झालें, पण असें नेहमींच कसें चालणार ? मुंबईत मी कामावर रूजूहि झालों.

मुंबईत बिऱ्हाड करावयाचें—पण व्यवस्थित जागा मिळायला पाहिजे—सारा जम बसवला पाहिजे—शिवाय बेबी ल्हान.... शशीनें आणि मी विचारविनिमय केला कीं सारें कांहीं मनासारखें जमेपर्यंत तिनें पुण्यासच रहावें आणि मी मुंबईतल्या चांगल्याशा एखाद्या हॉटेलमध्यें राहून मधून मधून सवडी सवडीनें पुण्या-मुंबईच्या खेपा मारीत रहावें— आणि तसा मी उपक्रमहि सुरू केला.

मध्यंतरीं केव्हांतरी वासूचें लग्न जमलें आणि कुठच्या तरी गांवीं तें झालेंसुद्धां. श्रीमंती थाटाचें आणि मानमरातबांचें लग्न नव्हतें तें. आणि तसं बघितलं तर त्याच्या लग्नाला आम्हीं कोणी जावयास पाहिजेच होतें असें नाहीं. त्याच्या घरांत कांहीं आमची एवढी जा-ये नव्हती—वासूबद्दल मला व्यक्तिशः जें काय वाटे तोच आमचा खरा संबंध !

गंमत अशी होई कीं, मी पुण्यास गेलो तरी किती थोडा वेळ मला तेथें राहण्यास मिळावयाचा ! देवदर्शनच होत असें माझें तें जणुं. लग्न झाल्यानंतर वासूची आणि माझी एकदां कुठें ओझरती गांठ पडली होती. त्याची मोकळेपणानें विचारपूस करणें कधीं जमलेंच नाहीं मला.

एका रविवारीं मी असाचा पुण्यास आलों असतांना मी एक नव-शिकीच मुलगी वाड्यांत पाहिली. पंधरा-सोळा बिऱ्हाडां मिळून किती तरी नव्या जुन्या मुली आणि मुलें त्या वाड्यांत असतील-

सर्वच कांहीं माहीत नव्हती. त्या नवशिक्या मुलीकडे विशेष कुतूह-लानें माझें लक्ष गेलें. ह्याचें कारण त्या मुलीच्या दोन्ही दंडांवर चोळीच्या टोकांशी काळे निळे डाग दिसत होते !

माझी जिज्ञासा वाढली—आणि मी शशीला विचारलें कीं शशी, ही कोण ग पाहुणी मुलगी ? आणि त्यावर शशीनें मला जें सांगितलें तें ऐकून मी आश्चर्यचकीत होऊन गेलों. ती नवी मुलगी म्हणजे वासूची बायको आणि तिच्या दंडावरचे निळे डाग म्हणजे वासूनें तिच्यावर छडीनें गाजविलेला पराक्रम !

शशीनें मला इत्थंभूत हकीकत सांगितली. ह्या मुलीला आई--बाप नाहींत. तिचे चुलत मामा हें तिचे पूर्वीचे पालक. त्या मामांनीं वाटतं हें लग्न जमविलें. मुलगी वासूला आणि त्याच्या आईला पसंत पडली. लग्न झालें, आणि मग त्यांनां कळलें कीं मुलीला नेहमीं 'फिट्स्' येतात....त्या मामांनीं आपणांस ही गोष्ट आधीं सांगितली नाहीं, त्यांनीं आपणांस साफ फसविलें असें त्याचें म्हणणें आहे. ती सगळी बिथरली आहेत आणि त्यांनी मुलीचे अनन्वित हाल चालविले आहेत म्हणे....

शशी एकेक सांगत होती, आणि मी मन घट्ट करून ऐकत होतों. वासू अशा तऱ्हेचा निघेल ही आपणांस कल्पना नव्हती. वासूची आई आणि जोडीला ती चिमुरडी बहीण वासूच्या बायकोला सासुरवास करीत असातील हें कुणाला खरेंसुद्धां वाटायचें नाहीं.

" मी वासूला प्रत्यक्ष विचारूं कां ?" मी शशीला म्हटलें.

" मेहेरबानी कर, पण त्यांच्यापैकीं एकाबरोबरहि ह्या बाबतींत बोलूं नको....बापाला बाप म्हणणार नाहींत, मित्राला मित्र म्हणणार नाहींत, अशा रानटी अवस्थेंत तीं सध्यां आहेत....त्यांना जनाची, मनाची, कसलीसुद्धां भीति वाटत नाहींसें दिसतें...."

आणि मी तसाच मुंबईस परत आलो.

पुढें प्रत्येक वेळीं मी पुण्यास गेलों कीं, प्रथम शशीजवळ वासू-संबंधीं चौकशी करावयाचा. आणि प्रत्येक वेळीं शशी कांहीं तरी नवीन बातमी द्यावयाची. तिला ते आंघोळच करूं देत नाहींत आणि तशी ती राहिली कीं, पारोशी रहायला लाज वाटत नाहीं का म्हणून दरडावतात. तिला मधून मधून फिट्स येतात ही गोष्ट मात्र खरी आहे; पण म्हणून तिला अशी परक्यासारखी आणि गुलामासारखी वागविणें त्यांचें त्यांनांच शोभतें.

वासू तिला दोन दोन तास आंगठे धरून उभी करतो म्हणे. तू मेलीस तर आम्हीं सुटूं म्हणून तिला तीं सारीं उघड बोलतात. ती वेडपट आहे, तिला अक्कल नाहीं, असें तीं बाहेर सांगतात, रात्रीं बेरात्रींसुद्धां तिला घराबाहेर उभी करून दारें आंतून लावून घेतात.... एक ना दोन....एकाकीच, रडत आणि सारें सहन करीत, बसून राहते कुठें तरी बिचारी ती !

आणि त्याच्या पुढच्या खेपेस शशीनें आणखीनच एक बातमी दिली. ह्या सासुरवासाची बोलबाला आतां सर्वत्र सुरूं झाल्यामुळें कोणी कोणी वासूला, त्याच्या आईला आणि बहिणीला अप्रत्यक्ष, प्रत्यक्ष बोलूं लागले आहेत. आणि स्वसमर्थनार्थ त्यांनीं आतां नवी-नच बूट काढला आहे....माझं आज अमूक अमूक चुकलें म्हणून मला आज अमूक अमूक शिक्षा झाली म्हणून शेजारच्या सर्व बिऱ्हाडकरांकडे जाऊन आधीं सांगून ये तरच घरांत घेऊं....आणि वेडी ती....ती तसं सर्वांकडे जाऊन सांगतें. करील काय बिचारी ! केलं तरी खाणार, नाहीं केलं तरी खाणारे !

शशी म्हणाली कीं, आतां त्यांचा असा निश्चय झाला आहे कीं, वासूचें दुसरें लग्न करावयाचें आणि हिला टाकून द्यावयाची—

मी चिडून म्हणालो कीं, फार चांगलं होईल त्यांनीं तसं केलं स्वत्वाची जाणीव होण्याकरितां, तर...., ती खरोखरीच मूर्ख असली

पाहिजे—कुंकू सिनेमा तिला दाखवून समजावून दिला पाहिजे.... हाल करतात काय? खरंच, शशी, जर कां ह्या वीर मंडळींनी तिचा त्याग केला, तर आपण तिला मदत करूं या, सेवासदनांत ठेवून तिला शिकवूं या आणि....

"सेवासदनांत ठेवायलासुद्धां नवरोबाची परवानगी लागते म्हणतात ध्यानांत आहे का?" शशी मान वेळावून म्हणाली.

राग, वैताग, अनुकंपा वगैरे विकारांनीं मला ह्यावर खरोखरच बोलवत नव्हतें! मी विचार करीत होतो कीं, पुरुष स्त्रीला असें वागवूं शकतो तरी कसा? गुलामगिरी नष्ट झाल्याला कितीतरी शतकें झालीं म्हणून मी इतिहासांत शिकलों; पण गुलामगिरी नष्ट झाली नाहीं—गुलामगिरी घराघरांत गजबजून राहिली आहे हें माझ्या ध्यानांत आलें.

मध्यंतरीं दोन-तीन वेळां वासू माझ्या नजरेस पडला! पण माझ्या ध्यानांत आलें कीं, तो आपणांस चुकवीत आहे बहुतकरून; मला खरोखरीच विचार पडला कीं, त्यागाच्या, स्वार्थत्यागाच्या गप्पा मारणारा पूर्वीचा वासू तो हाच का?

अन् ह्याला आतां उपाय काय? शशी तर मला वासूशीं हा विषय काढूं देण्यास तयारच नव्हती. ती म्हणे—फट् म्हणतां ब्रम्ह-हत्त्या व्हावयाची. आपला अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं.—चिखलांत दगड टाकल्यासारखें होईल तें. परिणाम तर कांहींच व्हावयाचा नाहीं; पण उलट स्वतःच्या अंगावर शिंतोडे मात्र उडावयाचे.

तिचें म्हणणें एका अर्थीं खरें होतें; पण माझ्या मतें हा एक मोठा अन्याय होता. कुणाची मुलगी घरांत आणतात काय, आणि तिचे हाल होतात काय? आणि ह्या अन्यायाची चौकशी अन्यायाचें परिमार्जन व्हायलाच पाहिजे होतें, माझ्या मतें.

मी कॉटवर पडलों होतो. पुण्यापासून १२० मैल लांब असलो, तरी मला पुण्यांतील चित्रच दिसत होतें. बासू, बासूची आई आणि त्याची बहीण, तीन बाजूला काठ्या घेऊन उभी राहून त्या निष्पाप जीवाला मारूं पहात होती—दुसऱ्या लग्नाची भीति दाखवीत होती— आम्हीं उद्यां नुसतें जाहीर केलें कीं, मुली सांगून येतील....दुसरं लग्न केलंच पाहिजे:...अशा तऱ्हेच्या त्यांच्या वल्गना चालल्या होत्या...!

काय असेल तें असो; पूर्वीं कधीं न आलेला अनुभव तो....मला तें चित्र बघून त्वेष आला—स्वतःस न कळतच मी कॉटवरून उठलों आणि लिहूं लागलों—

श्रीयुत वासुदेव महेश्वर हिरवे ह्यांस,

सप्रेम नमस्कार, विनंति विशेष—

मला नुकतेंच असें कळलें कीं, आपण विवाह करूं इच्छितां. माझी भाची लग्नाची असल्यामुळें हें पत्र लिहीत आहे. आपल्या लग्नाच्या काय काय अटी आहेत हें मला कांहीं माहीत नाहीं. पण मुलगी चार बुकें शिकून तिला व्यक्तित्वाची जाणीव झाली असल्यामुळें तिच्या मतांनां मात्र मी प्राधान्य देतो. अर्थातच तिच्या स्वतःच्या अशा कांहीं अटी आहेत—प्रथम दर्शनीं त्या कुणालाहि जरा विचित्र वाटण्याचा संभव आहे, पण तिचा हेतु ध्यानांत घेतां त्या अटी फार मोलाच्या आहेत असें माझें स्वतःचें मत आहे. तिच्या अटी म्हणजे, तिला नवरा प्रथमवर नको—तो बिजवरच पाहिजे, आणि त्याची प्रथम पत्नी मयत नसली पाहिजे—ती जिवंतच असली पाहिजे. तिला सासू पाहिजे, नणंद पाहिजे. आणखी कोणीहि आणि कितीहि नातलग असले तरी चालतील. पण सासू, नणंद, आणि नवरा सुनेला क्रूरपणें वागविण्यांत तरबेज पाहिजेत. त्यांनां भावनां नसल्या पाहिजेत. सुनेमधले दोषच त्यांनां बघतां आले पाहिजेत. तिचे गुण त्यांच्या

त्यानींच येतां कामा नयेत. सुनेकडे गुलाम म्हणूनच त्यांनीं नेहमीं बघत राहिलें पाहिजे. टांग्याला चारी बाजूनीं जखडून बांधल्यानंतर दुष्ट टांगेवाला घोड्याला बेदम मारतो त्या टांगेवाल्यांचें शौर्य आणि पराक्रम त्यांच्यांत पाहिजेत. सुनेचें कौतुक आणि लाड कोणच्याहि कारणानें त्यांनीं करतां कामा नये. सुनेला मुलीप्रमाणें वागवितां कामा नये. घरांतील हक्काची मोलकरीण म्हणूनच तिच्याकडे नेहमीं त्यांनीं पाहत राहिले पाहिजे.

आणि मला मिळालेली माहिती जर खरी असेल, तर तिच्या अटी आपणाशीं बरोबर जुळतातसें वाटतें. आपला जर तसा मानस असेल तर ताबडतोब कळवावें. कळावें.

आपला

........?

वरील पत्राच्या खालीं मी सही केली नाहीं किंवा माझा पत्ताहि लिहिला नाहीं. भावनेच्या भरांत जें लेखणींतून उतरलें तें लिहिलें. हृदयाला टोचे बसतील इतकी अणकुचीदार बाणफेक होती ती ! जेमतेम एकदां तें पत्र वाचलें—मनाचें समाधान झालें—आणि लिफाफा बंद करून बिननांवाचें तें पत्र लगेच पोष्टांत टाकलेंहि मी गर्दीगर्दीनें.

आणि मग माझ्या लक्षांत आलें कीं आपण जें पत्र लिहिलें तें पत्र शिष्टाचारास आणि सदभिरुचीस धरून नव्हतें. एवढेंच नव्हे तर, स्वतःच्या मनाशीं आणि आचारांशीं अगदीं विसंगत असें होतें तें. मग मी त्यावर सांगोपांग विचार करूं लागलो. आपण जें पत्र लिहिलें त्यांतील भाषा आणि पद्धती सरळ नव्हती, बोचक, खोचक आणि खवचट होती. आपण लिहिलेल्या पत्राचा लेखक कोण त्याचा शोध कदाचित लागेल, कदाचित लागणार नाहीं, पण असलें पत्र लिहिण्याचा खरोखरी आपणांस अधिकार पोंचतो का ?

वासू, वासूची आई, आणि त्याची बायको ह्यांच्यामधील झगडा म्हणजे कांहीं व्यक्तींचा आणि एका कुटुंबाचा खाजगी प्रश्न नाहीं का ?

पण त्याचें मी स्वतःशीच उत्तर दिलें कीं हो, तो प्रश्न वैयक्तिक, कौटुंबिक आणि खाजगी स्वरूपाचा तर खचित आहे, पण त्याबरोबर वासू ज्या समाजांत वाढला आणि आज वावरत आहे त्या समाजांतच त्याला एका गरीब बिचाऱ्या मुलीचा छळ करतां येतो आणि हें सारें तो समाज, तीं भोवतालची मंडळी मुकाट्यानें पाहतात, ही वस्तुस्थिति चांगली आहे का ? हा मात्र खात्रीनें एक सामाजिकच प्रश्न आहे—हा सार्वजनिक अन्याय आहे—शेजाऱ्या पाजाऱ्यांनीं कीं ज्यांनां हा उघडउघड अन्याय चालला आहे हें समजत आहे, त्यांनीं त्या मुलीच्या मदतीला धावणें, एवढंच नव्हे तर, मर्यादातिक्रम करणाऱ्या वासूच्या डोळ्यांत येनकेनप्रकारेण झणझणीत अंजन घालून त्याला ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करणें, त्यांचें खचित कर्तव्य आहे. आपण निनावी पत्र लिहिलें ह्यांत आपला हेतु काय होता ? निनावी पत्र लिहिणारे सहसा दुष्टबुद्धि असतात. आपला हेतु कुणाचेंहि वाईट करण्याचा खचित नव्हता ना ?

पण प्रश्नाची आणखी एक बाजूहि माझ्या हळू हळू ध्यानांत आली. निनावी पत्र लिहिलें तें समर्थनीय असो अगर नसो; पण त्याचा परिणाम काय ? तें पत्र वासूला मिळेल, आणि तें वाचल्यानंतर त्याला लाज आणि भीति तर खचित वाटेल; पण त्यामुळें त्याच्यामध्यें कांहीं सुधारणा होईल का ? तसं झालं तर, त्या निनावी पत्राचें सार्थकच झालें म्हणावयाचें. पण मानसशास्त्राचा थोडा जरी विचार केला, तरी एवढें नक्की होतें कीं तें तसलें पत्र वाचल्यानंतर वासू स्वतः सुधारणेच्या मार्गावर तर खचित येणार नाहीं, उलट तो अधिकच चिडेल........प्रकरण आणखीच वाईट होऊन जाईल.

आणि मग मात्र वाटलें कीं, कर्तव्य सद्धेतु वगैरे गोष्टींनीं प्रेरित होऊन जरी आपण तें व्याजोक्तीचें पत्र लिहिलें तरी तें निनावी असें पाठवून आपण खरोखरी मिळविलें तरी काय ! त्याऐवजीं तेंच आणि तसलेंच एखादें परिणामकारक पत्र आपण उघडपणेंच लिहूं शकलों नसतों का !

मनामध्यें मोठा कोलाहल उत्पन्न झाला होता. आपण तें निनावी पत्र लिहिलें ही गोष्ट खरोखरीच वाईट झाली अगर चांगली झाली ? गोष्ट वाईट झाली असली तर तिची दुरुस्ती कशीं करावयाची — अन् खरं म्हणजे ज्या उच्च हेतूनें आणि सात्त्विक उद्वेगानें तें लिखाण आपल्या हातून उतरलें, त्या हेतूच्या प्रीत्यर्थ आपण कांहीं तरी पूरक असें करावयास नको का ?

विचारप्रवाह दुथडी वाहूं लागले — लेखणी पुन्हा सपसप चालूं लागली —

प्रिय वासूस

हें पत्र म्हणजे जरा अनपेक्षितच, परंतु तुझा आमचा परिचय फारा दिवसाचा असल्यामुळें, प्रतिकूल परिस्थितींतून वर येण्याची तुझी धडपड मला माहीत असल्यामुळें व अंतरी तुजकडे अत्यंत सहानुभूतीनें मी सतत पाहत असल्यामुळें प्रस्तुत पत्र एक पवित्र कर्तव्य म्हणून लिहिण्याचें योजिलें.

कांहीं दिवसांपूर्वी पूर्वी न पाहिलेल्या एका मुलीला मी आपल्या वाड्यांत पाहिली. तिच्या दंडावर निराळ्याच तऱ्हेची वलये दिसल्या-मुळें उत्सुकता जागृत झाली व तत्संबंधीच्या चौकशींतून मला एक हृयविदारक कहाणी व इतिहास ऐकावयास मिळाला. अर्थात् वाईटच वाटलें. उपलब्ध असलेल्या मार्गें मी जरा अधिक चौकशी केली व माझें मत निश्चित केलें.

तुझ्या मनाची स्थिति मी जाणतों. आपणांस कुणी तरी फसविलें, आपण पुरते फसले गेलो, आपलें आयुष्य फुकट गेलें अशा तऱ्हेच्या कांहींतरी कल्पना तूं करून घेतल्या आहेस. पण मला तुजपेक्षां किंचित अधिक अनुभव आहे व मी तुला कांहीं सांगितलें तर तें तुझ्या कल्याणाचेंच असेल — अकल्याणाचें निश्चित नसेल, ही जर तुझी खात्री असेल तर विश्वास ठेव कीं, असल्या कल्पना करून घेण्यासारखा मूर्खपणा नाहीं.

तुझी बुद्धि प्रखर असून तूं आईला आणि बहिणींना शक्य तितक्या लवकर कष्टांतून आणि काळजींतून मुक्त करावयाचें म्हणून उच्चशिक्षणांवर पाणी सोडलेंस—आणि एवढ्या लहान वयांतच नोकरीचें—अल्पवेतनाच्या नोकरीचें—जूं मानेवर घेतलेंस ह्या संबंधीं तुझें माझें बोलणें झालेलेंच आहे. व तुझ्या त्यागाबद्दल तुझी कोणीही प्रशंसाच करील.

अमूक व्यक्तीमध्यें शारीरिक, मानसिक वा इतर कांहीं उणिवा आहेत हें तुला लग्ना आधीं कळलें नाहीं.—ते कळविण्याचा कुणी प्रयत्न केला नाहीं, व अखेरीस तूं फसलास.—सारेच फसतात असे. मुलींमधील उणीवा पालक जर आधींच जाहीर करूं लागले तर शेंकडा पन्नास टक्के लग्नें मोडून जातील. मुलगी पसंत म्हणून सांगण्या आधीं आपणास जरूर असलेली माहिती अन्य मार्गांनीच मिळवायची असते, अशी पद्धत आहे.—त्यांत पालक दोषास्पद ठरतच नाहीं. कधींही—पण चर्चेकरीतां धरून चालूं कीं, तूं सर्वस्वी फसलास— पण कोणत्याहि न्याय शास्त्रांत शिक्षा म्हणून जीं काय करायची असते ती कुणाला? गुन्हेगाराला! अव्वल, निस्साहय्य अशा प्राण्यांना नव्हे!

क्रयविक्रयाच्या विवाहसंस्थेमध्यें ज्या प्राण्याला शिक्षा भोगावी लागत आहे. व त्या प्राण्याचा फसवा फसवीचा म्हणून संघोषण्यांत

येणाऱ्या त्या गुन्ह्याशीं होता का ? खचित् नाहीं. एवढंच काय, पण आपल्यामधील उणीवा आगोदरच माहीत करून देणें इष्ट आहे. ह्याची जाणीव व ज्ञान त्या प्राण्यांना जरी असतें, तरी तसें करण्यास आपल्या विवाहसंस्थेनें सवड ठेवली आहे का ?

मुली कितीहि वेडया आणि मूर्ख असल्या तरी दुसऱ्या घरीं पाय ठेवीत असतांना किती विश्वासानें शिरत असतात त्या तिथें ! पण ज्यावेळीं नव्या घरांतील आपण चालत असलेली जमीन निसरडी आहे, आपणांस येथें वाटला तसा आधार नाहीं — आपण येथें निराश्रित, निराधार आहोत म्हणून ध्यानीं येतें, त्यावेळीं त्यांच्या मनाची स्थिति काय होत असेल, ह्याची स्वतंत्रपणें तुला कल्पना करतां येणार नाहीं काय ?

वेड्यांना शहाणें करण्यांतच मनाचा मोठेपणा आणि माणुसकी असते ! वेड्यांना वेडपट म्हणून सारीच हेटाळतात आणि त्यामागें त्यांना अधिक वेडी करतात मग त्यांच्यांत आणि विचारी व सहनशील माणसांत फरक तो काय ?

दिली स्थिती देवानें तीतच मानी सुख कधिं विटूं नको. परिस्थितीशी झगडून प्रगतीचा प्रयत्न करीत राहिलें पाहिजे. नैराश्यवाद उराशी बाळगून परिस्थितीला दोषच देत राहिलं तर स्वतःची बाह्यतः अवनती तर होतेच पण वर, त्यामुळें स्वतःच्या हातून एरवीं न होणारे अनेक नैतिक गुन्हे होतात.

टाकीचे घाव मारून दगडालाहि देवपण आणतां येतें. आपण माणसें आहोंत भौतिकयुगांत माणसास अशक्य काय आहे ? मनांत मात्र आलें पाहिजे. तूं मास्तरकीचा पेशा पत्करला आहेस. तुझ्यावर समाजधारणेची थोडीफार जबाबदारी आहे आणि समाज म्हणजे अनेक कुटुंबाचा एक समुदाय तुझें स्वतःचें घर जर तुला स्वस्थ आणि शांतपणें सावरता आलें नाहीं तर तूं समाजसुधारणा

ती काय करणार ? तुझ्या हाताखालून तयार होत असलेली मुलें आज त्यांच्या बाल्यत्वामुळें ह्यासंबंधीं कांहींच बोलत नसलीं तरी उद्यां त्यांना तुझा इतिहास व वागणूक समजली तर तीं खचित असं म्हणतील कीं, लोका सांगे ब्रह्मज्ञान आपण ठणठणीत पाषाण, नव्हे पाषाणहृदयीहि — असे आमचे मास्तर होते.

आयुष्य हें किती अल्प आहे ! त्यांतील तारुण्याचें दिवस फार मोलाचें असतात. सर्वांनांच अनुकूल परिस्थिती नसतें; पण प्रतिकूल परिस्थितींतूनहि आनंदानें, समाधानानें आणि धैर्यानें परिस्थिति अनुकूल करण्याकडे माणसानें नेहमीं पहात राहिलें पाहिजे.

आई, भाऊ, बहिणी, आप्त हीं सगळीं आपलीं तर खचित्, पण जिवाचा खरा जोडीदार पत्नीच होय ! आणि तिला पतीनें आधार देणें हें सर्वांत मोठें माणसा-माणसांचें कर्तव्य आहे.

विचार कर. पदरीं पडलें सोनें झालें. विनाकारण निराश होऊं नकोस व सोन्यासारख्या आयुष्याची माती करूं नकोस. लक्षांत ठेव कीं, वैरवर ओबडधोबड दिसणारें धातू जरा कानस मारली कीं कसें लकूलक् करूं लागतात ! स्वार्थत्याग म्हणजे काय हें तुला स्वतःला माहीत असतांना स्वतःचें सुख दुःख, स्वतःचा नाश, अशी कोत्या वृत्तीची भाषा न काढतां आपलें सुखदुःख, आपला नाश वा आनंद असें कुटुंबाचें व्यापक स्वरुप धरून आसपास जरा अधिक सहानुभूतीनें पहा. घरांत आपण होऊन न आलेली तर आपण आणलेली मुलगी आपल्या सुखदुःखाची भागिदार आहे—ती परकी नव्हे, ती गुलाम तर खचित्च नव्हे, हें निश्चितीनें समजून आस !

रोग इतका किडल्यानंतर तो बरा होण्यास वेळ लागेल हें मी जाणतो. पण म्हणून त्याला योग्य उपाययोजना करायचीच नाहीं कां ? वेड्या, अगदीं अखेरच्या घटकेपर्यंतसुद्धां रोग्याला बरें करावयाचें मानवी प्रयत्न चालू ठेवायचें असतात—

तुझ्या आणि तुमच्या दुसऱ्या लग्नाच्या कल्पनेबद्दल मला पुष्कळ लिहितां येईल. लग्न करून आपल्या पतित्वाच्या हक्काचा दुरुपयोग करून पत्नीला टाकून देण्याचें पराक्रम अनेक करतात, पण तुम्हीं जर एकीला टाकून त्याऐवजीं दुसऱ्या एखादीला घरांत आणण्याचें खरोखरी योजींत असाल, तर ह्या बाबतींत एवढंच सांगतों कीं, एखादा अडलेला बाप आणि आणखी अभागी मुलगी तुमच्या दाराशीं चालून येईलहि कदाचित, पण लक्षांत ठेव कीं, त्यामुळें तुला आणि तुम्हाला आज वाटत आहे तसा एक क्षणहि आनंद उपभोगतां यावयाचा नाहीं. स्वकर्माचीं भुतें तुला आणि तुम्हांला क्षणाक्षणाला भेडसावतील आणि पहिलीची जी स्थिति तिच दुसरीची असा प्रसंग ओढवेल....दुसऱ्या लग्नाची गोष्ट पुन्हां उच्चारून स्वतःच्या हयात सहचारीचा अपमान करूं नको.

हें पत्र लिहिण्याचा उद्देश तुला दोषी ठरवून दुखाविण्याचा बिलकूल नाहीं. माणूस अशा परिस्थितींत असा होणें साहाजिक आहे. अशा वेळीं आपलीं दुःखें कुणाजवळ सांगता येत नाहींत. दुसऱ्यांचीं दुःखें समजावून घेण्याच्या मनःस्थितींत माणूस नसतों आणि तो चुकतों, घसरतों आणि स्वतःस नकळत तो अधिकच खोलांत जातो. आणि अशा वेळीं खरोखरी सहानुभूतीनें एखाद्याचा आदेश आणि सात्विक आधार मिळाला तर त्याला तेवढासुद्धां तो पुरेसा होतो.

म्हणून म्हणतों कीं, हें पत्र एकदां नव्हे दहादा एकांतांत बाच, आयुष्याकडे आशेनें आणि सहचारीकडे सहानुभूतीनें बघूं लाग आणि प्रस्तुत पत्र पाचोळा ठरणार नाहीं ही माझी आशा सफल कर.

हें पत्र लिहितें वेळीं मला एक सुखस्वप्न पडत आहे. सर्व आढ्या आणि गैरसमज बाजूस करून तूं कर्तव्य आणि प्रेम ह्यांचा मिलाफ करूं शकला आहेस-फर्ग्युसनच्या टेकडीवर जरा एका बाजूस "एकत्र" बसला आहेस आणि त्या ठिकाणीं मीहि सहजच शशीबरोबर फिरत

फिरत आलो आहे. आणि तुला आणि तुझ्या "तिला" आयुष्यांतील आनंद एकत्र लुटतांना बघून, सात्विक समाधान पावून, शशीला मागच्यामागेच ओढून तुम्हांला आमची चाहूल लागूं न देतां मी माझी वाट बदली आहे—कल्पनासृष्टि आहे ही- पण कुणी सांगावें, ही सत्यसृष्टिहि ठरेल आणि जग, शेजारी, समाज, सारींसारीं चकित होऊन जातील आणि सहारांतून उत्कृष्ट बगीचा निर्माण होईल.

निदान, मी तरी नेहमीं आशेवरच जगत असतो!

तुझाच

—बापू

मी लिहिलेल्या पत्राचा वा पत्रांचा परिणाम काय होतो इकडे माझे डोळे लागून राहिले आहेत.

## जुनी छत्री : : ७

माझ्या वापरत्या छत्रीचा घोडा निसटलेला बघून तात्पुरती वापरण्यास दुसरी एकादी जुनी छत्री आहे किंवा नाहीं हें मी बाजूच्या खोलीमध्यें शिरून पाहूं लागलों. पहिल्याच खुंटीवर एक जुनाटशी छत्री होती. कोळिष्टकें, कचरा वगैरे झटकण्याकरितां मी ती एकदोनदां पुढेंमागें केली, तोंच त्या छत्रीच्या आंतल्या बाजूस बारीक अक्षरांत रंगविलेलें नांव दिसलें मला—"सौ० शांता...."

"हें काय चाललं आहे!" मागून येऊन इंदिरेनें मला विचारलें.

आणि ती छत्री बघून ती उद्गारली—"शांताची छत्री ती. परत करायची राहिलीच अखेरीस!"

"राहूं दे," मी उद्गारलों, आणि अगदीं नकळतच मी एक उसासा सोडला.

दुखावलेल्या पायाला खडा लागला कीं जशी बारीकशी कळ येते, तशीच कांहींशी कळ मस्तकांतून हिरहिरून गेली माझ्या. कांहीं आठवणीमुळें, चेहऱ्यावर उमटूं पाहणारे विकार दडवून टाकले मी निर्विवाद, पण....

गेल्या नाताळांतलीच गोष्ट ती. साहित्यसंमेलनाचें वार्षिक अधिवेशन सहसा चुकवायचें नाहीं अशी आम्हां कांहीं मित्रमंडळींची पद्धतीच पडून गेली असल्याकारणानें, यंदाच्या अधिवेशनास कोण कोण नक्की येणार ह्यासंबंधींच बोलत होतों आम्हीं एकत्र. इंदिरेची आज किती दिवस आमच्याबरोबर संमेलनास यावयाची इच्छा होती, परंतु लहान मुलांना घेऊन कोणच्याहि सभासंमेलनास जाण्याच्या मी विरुद्ध असल्याकारणानें आणि मुलांना अशावेळीं आपण आपणाबरोबर नेलें तर मुलांच्या हालांची बाब अलाहीदाच, पण स्वतःलाहि संमेलनाचा आनंद उपभोगतां येण्याऐवजीं स्वतःचाच इतरांकडून केव्हां केव्हां कसा उपहास होतो ह्याची प्रत्यक्ष कल्पना आणि इंदिरेस असल्याकारणानें आजपर्यंत ह्या बाबतींतील तिची इच्छा अपूर्तच राहिली होती.

पण यंदा विमल जवळजवळ तीन वर्षांची झाली होती. इंदिरेचा एक मामा मुंबईत रहात असे. आणि विमलला संमेलनाच्या आधीं मामाकडे ठाकायची असें इंदिरेनें ठरविलें होतें. ‘ विमलला चारपांच दिवस मी संभाळीन कीं—माझी नाहींत कां मुलें ? खेळेल त्यांच्यांत ती... .” अशातऱ्हेचें आश्वासनही तिनें आपल्या मामीकडून आगाऊच मिळवून ठेवलें होतें.

विमल चार पांच दिवस का होईना पण आईविना एकटी राहील अगर नाहीं हा प्रश्न जरी बाजूस ठेवला तरी माझी आणखीहि एक अडचण होती आणि ती मी इंदिरेला बोलूनहि दाखविली——

“तिथें आम्ही जाणार टोळक्यांनीं....तेव्हां जर कां जमलं तर गांवातल्याच तुझ्या एकाददोन मैत्रिणीहि तुझ्या बरोबर येणार नाहींत कां ? आमच्या सारखं बायकांचहि एक स्वतंत्र टोळकं असलं

तर आपल्याला वाटेल तेव्हां एकत्र जमतां येईल, वाटेल तेव्हां सुटंहि फिरतां येईल...."

"तींहि व्यवस्था मी आधींच केली आहे. शकू नि शरद्, आपण कोणी जर गटानें जाणार असलों तर, येणार आहेतच संमेल-नाला."

अन् इतक्यांत मनोहरला उद्देशून इंदिरा म्हणाली---

"खरंच, काय हो मनोहर, तुमचं यंदाच लग्न झालं आहे.... शांताला बरोबर तुम्हीं घेणार असालच कीं....तुमची कांहीं आमच्या सारखी अडचण नाहीं अजून."

"हं बघूं कीं" मनोहरनें हंसत हंसत उत्तर दिलें. शांताहि बरो-बर येणार ह्या कल्पनेनें इंदिरा आनंदित झाली.

पण आम्हांस लवकरच समजलें कीं, पूर्वी बोलणें झाल्याप्रमाणें, शांता संमेलनाला येत नाहीं म्हणून. अन् ही बातमी इंदिरेनें ऐकल्या बरोबर हजार शंका काढल्या तिनें माझे जवळ. एवढी शिकलेली मुलगी-साहित्यिकाची बायको- स्वतःहि थोडेशी साहित्यिक, अन् साहित्य देवीची ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष उपासना होणार त्या ठिकाणींहि इतकी संधि आली असतांना त्या संधीचा फायदा घेत नाहीं हें एक आश्चर्यच नाहीं का? कदाचित् तुमचे मनोहरच नांवापुरते, बाहेरून केवळ तत्वापुरते, स्वातंत्र्याचे भोक्ते असतील, पण आंतून ह्यांची शांतावर फार मोठी कदर असेल. किंवा तिला बरोबर घेतली तर कोणी आपली थट्टा करतील अशी लाज, भीतिहि वाटत असेल मनोहरना...एकना दोन, इंदिरेच्या त्या अनेक शंका ऐकून मोरोपंतांच्या संशय--रत्न--मालेचीच आठवण झाली मला.

"तुम्हीं जाऊन एकदां विचारून यांना त्यांना प्रत्यक्ष." इंदिरेनें मला सुचविलें. आणि खरोखरींच मी मनोहरच्या घराचा रस्ता धरला.

मनोहरचा भाऊ अंगणामध्यें चेंडूशीं खेळत होता, मी त्याला विचारलें–"आहे कारे बहिनी–दादा घरांत ?"

"वहिनीं गेलीय जेवायला कुठेशी ?"

इतक्यांत मनोहरच्या आईनें मला बघितलें आणि ती मला म्हणाली—"मनोहर आंघोळ करीत आहे. जरा बसा, येईल आतां पांच मिनिटांत..."

मी खुर्चीवर बसलों—टेबलावर एक चौकोनी वही उघडी पडली होती; मी सहजच ती हातांत घेतली. मला आश्चर्य वाटले. वहीच्या त्या उघड्या पानांवर लिहिलें होतें—

पैशाविना मनुष्याच्या इच्छाआकांक्षा फुकट आहेत. संमेलन म्हणजे कांहीं कोणाच्या मैदानांतील जाहीर आणि मोफत व्याख्यान नव्हे कीं वाटेल त्यानें वाटेल तसें जावें आणि निघून यावें ! संमेलनाचा एकट्याचाच खर्च डोईजड झाला आहे मला, पण ही गोष्ट बाहेर कुठं बोलतां येत नाहीं. माझा स्वतःचाच कार्यक्रम ठेवला गेला नसता तर, शांतीला टाकून, मीच यंदा संमेलनाला गेलों नसतों, पण....समजूतदार मुलगी आहे ती, भाग्यच आहे माझं तें....

अन् मनोहर शांताला बरोबर कां घेत नाहीं हें मला स्पष्ट कळून आलें—वाईट वाटलें मला, जरासा कष्टीच झालों मी मनांतल्या मनांत !

विचार केला थोडासा—आपण त्याला स्पष्टच विचारावें—कदाचित् पैशाची जराशी अडचण वगैरे सध्यां असली तरी काळजी करूं नको तूं म्हणून आपण त्याला आश्वासन द्यावें—

इतक्यांत मनोहर बाहेर आल्याचा भास झाला मला. आपण आतां जें काय वाचलें ते मनोहरचें अगदीं खाजगी लिखाण होतें, मित्र झालो म्हणून तें वाचण्यास आपणांस अधिकार असा पोंचतच नव्हता खचित्, अन् तें आपण वाचलें आहे ही गोष्ट मनोहरच्या

ध्यानांत आली तर ती त्याला आवडणार नाहीं निर्विवाद....अन् जरा गर्दीनें आणि लगबगीनेंच मी ती चोपडी जशीच्या तशीच पुन्हां टेबलावर ठेवून दिली आणि चटकन् दूरच्या दुसऱ्या एका खुर्चीवर जाऊन बसलों.

मनोहर तेवढ्यांत आलाच; आणि जणुं आपणास कांहीं माहीतच नाहीं अशा आविर्भावानें मी मनोहरला म्हटलें---

" कायरे बुवा, शांतावहिनी येत कां नाहीं संमेलनाला ? "

" नाहीं येत म्हणते ती. " मनोहरनें सहजच असें उत्तर दिलें. पण टेबलावरील वहीकडे लक्ष जाऊन ती त्यानें अगदीं सहजासहजी अशीच टेबलाच्या ड्रावरमध्यें टाकलेली बघितली मी. ती वही माझ्या नजरेखालून सुटली अशा समाधानानेंच जणुं, त्यानें माझ्याकडे बघितलें.

" घे कीं बरोबर तिला—आपण सगळे बरोबरीनें जात आहोंत... "

" नाहीं येत ती, काय करणार ? " मनोहरनें तेंच उत्तर दिलें. साऱ्या साऱ्या गोष्टी मनोहरनें लपवून ठेवल्या माझ्यापासून.

मोठा नाजूक प्रसंग आणि नाजूक प्रश्न होता तो ! ह्या बाबतींत त्याजजवळ स्पष्ट आणि उघड बोलायचें ठरविलें होतें मी जरा वेळापूर्वी. पण तसें बोलण्याची प्रत्यक्ष वेळ आली त्यावेळीं डळमळलों मी. मनांत आलें कीं, असली भाषा काढून, त्याची संमति मिळण्याऐवजीं, त्याला मनांतल्या मनांत क्लेश, मनस्तापच अधिक वाटणार नाहीं कां ? अपमान वाटणार नाहीं कां त्याला तो ?

काय असेल तें असो. मी केलें तें चांगलें कां वाईट हें कांहींच सांगतां येत नाहीं मला, पण परस्पर विरोधक विचारांच्या त्या गुंतागुंतीमध्यें, मी अधिक कांहींच त्यासंबंधीं बोललों नाहीं. बोलू

शकलों नाहीं, उगीचच नेहमीसारखं दहापंधरा मिनिटें इतर विषयावर आणखी संभाषण करून मी घरीं परतलों.

मन प्रसन्न नव्हतें माझें. " कां कोणास ठाऊक, पण शांता येत नाहीं. एवढी गोष्ट मात्र नक्की "एवढेंच फक्त मी इंदिरेला सांगितलें.

× × ×

अमूक गाडीनें आपण जावयाचें आणि म्हणून अमूक वाजतां सर्वांनीं एकत्र स्टेशनवरच प्रथम भेटावयाचें ठरविलें होतें. शांता संमेलनाला येत नाहीं म्हणून पुन्हां पुन्हां मनांत येत होतच, पण...

आम्ही स्टेशनवर जाऊन पोंचलों. मनोहर आधींच आला होता आणि त्याजबरोबर शांताहि आलेली दिसली मला. आणि मी कांहीं बोलणार त्याच्या आंतच इंदिरेनें माझ्या कोटाला एक हळूच हिसका दिला आणि म्हटलें—" आली वाटतं शांता अखेरीस ? "

अन् तिला राहवलें नाहीं—माझ्या उत्तराचीहि वाट पाहिली नाहीं तिनें. ती पुढें शांतेलाच म्हणाली—

" ठरला वाटतं बेत शेवटीं ? "

" छेः, मी तुम्हांला दादरपर्यंत पोंचवायला येत आहे. "

" मग संमेलनापर्यंत चला कीं पुढें " शकूनें म्हटलें. शांतेनें नुसतें हंसल्यासारखें केलें.

" दादरला कशाला आत्तां ? " शरदनें विचारलें.

" तुम्ही सगळीं परत येईपर्यंत माहेरीं राहणार आहे दादरला मी. "

" वाः, कमाल आहे बाई. "

इंदिराच काय पण शकू आणि शरदहि बुचकळ्यांत पडल्या होत्या. परिस्थिति इतकी अनुकूल असतांना मित्रमैत्रिणींचा इतका

आग्रह चालला असतांना शांता संमेलनास येण्यास तयार नव्हती—माहेरी, ह्यावेळीं कांहींहि विशेष प्रयोजन नसतांना ते चारपांच दिवस तिथेंच घालविणें बरें वाटत होतें तिला....खाजगी कारणांची अधिक मीमांसा करीत बसणें इष्ट वाटलें नाहीं कोणालाच त्यावेळीं.

दादरला आम्हांस गाडी बदलावयाची होती. स्टेशनवरून बाहेर पुलावरून आम्ही चालूं लागलों. आम्ही निघालों त्यावेळीं, एक तासापूर्वी, आकाशांत जरासे मळभ आले होते. त्यावेळीं दादरला मळभ होते अगर नाहीं कोणास ठाऊक. पण ह्यावेळीं मात्र प्रखर उन्हानें रस्त्यावरची माणसें करपून निघत होतीं नुसतीं !

पाऊस अगर ऊन नसतांना छत्री हें माणसाला एक लोढणें आहे अशा समजुतीनें इंदिरेनें आपणांबरोबर छत्री घेतली नव्हती. पण ह्यावेळीं अंगांतून घामाच्या धारा सुटल्याबरोबर मात्र तिच्या तोंडून आपोआपच उद्गार बाहेर पडले—" खरंच छत्री घेतली असती तर किती बरं झालं असतं, नाहीं ? "

" अहो, माझी घेऊन जा कीं छत्री, मला इथेंच जायचं आहे गांवांत...." शांतानें आपली छत्री इंदिरेच्या हातांत अडकावलीच.

" मग नाहीं येत तुम्ही ? " इंदिरेनें पुन्हां एकदां प्रयत्न करून पाहिला.

" नाहीं. नाहीं." स्वतःच्या कपाळावरील घर्मबिंदु टिपीत शांतेनें उत्तर दिलें.

पुन्हां मनांत आलें कीं, अजून तरी धीर करून " पैशाची कांहीं अडचण असेल तर तूं फिकीर करूं नकोस, मी ह्यावेळीं पुष्कळ जादा पैसे घेतले आहेत बरोबर, पण शांतावहिनीला घेच ह्या वेळेस." म्हणून मनोहरला सांगावें आपण, पण....तोंडांतून कांहींच शब्द बाहेर पडले नाहींत अखेरीस !

शांता बाजूचा पूल उतरत होती आणि आम्ही बी. बी. च्या फलटाकडे चाललों होतों. मनोहरनें शांतेकडे आणि शांतेनें मनोहरकडे पुन्हां एकदां वळून बघितलें—बाह्यत: समाधान आणि आनंद यांचा केवढा अभिनय सजविला होता दोघांनींहि आपापल्या मुद्रेवर! पण त्यांच्या नजरेंतला करुण भावार्थ मला एकट्यालाच समजत होता त्यावेळीं, आणि म्हणूनच मी मनांतल्या मनांत जास्तीच व्याकुळ होऊन गेलों होतों अगदीं!

× × × ×

ते तीनचार दिवस म्हणजे एक सार्वजनिक दिवाळीच, नाटिका, गाणीं, चर्चा, भाषणें आणि जेवणें...मोठ्यामोठ्या माणसांना लहानपणचीं आठवण होऊन बालिश चाळे करण्याचा मोह होणें, जुन्या मित्रांच्या भेटीगांठी, नव्या स्नेह्यांची ओळख .... ....आरडाओरड, धुमाकूळ आणि आनंदी आनंद...ते चार दिवस केव्हांच संपले.

मनोहरचा स्वत:चा एक कार्यक्रम होता....किती यशस्वी ठरला तो—पण तो प्रत्यक्ष बघण्यास, त्याचें प्रत्यक्ष कौतुक करण्यास त्याची शांती तेथें नव्हती! इतरांना एवढेंच काय आमच्या गटांतील मंडळींनासुध्दां त्या गोष्टीची जाणीव वा आठवण नव्हती. पण मला....मी मनोहरच्या प्रत्येक हालचाली अत्यंत सूक्ष्म रितीनें न्याहळीत होतो....आणि तो जरी बाह्यत: आनंद आणि समाधान दाखवीत होता तरी त्याची अस्वस्थता मला दिसत होती आणि त्यामुळें मीहि अस्वस्थच झालों होतों. मीहि बाहेरून सर्वांशीं एकरूप झालों होतों. पण आंतून....

प्रतिनिधित्व, बसती, जेवण, चहा वगैरे साऱ्याबद्दल म्हणून प्रत्येकीं साडेसात रुपये वाजवले आम्हीं. रेल्वेचा खर्च, टांगा, हमाली वगैरे हिशेबांत धरतां एकंदरींत दहा अकरा रुपये खर्च आला आम्हांला प्रत्येकीं.

साहित्य संमेलनाची दिवाळी साजिरी करून आम्हीं परत आलों.

शांताहि माहेराहून परत आली.

" इश्श, तुम्हीं आला असतात तर काय झालं असतं? किती किती मजा केली आम्हीं!" शकू, शरद आणि इंदिरा शांताला म्हणाल्या.

आणि मुद्रेवर किंचितूही विकार न दाखवितां शांतेनें उत्तर दिलें—" खरंच, आलें असतें तर बरं झालं असतं."

स्वतःचा 'त्याग' हि चोरून लपवून ठेवावा लागत होता तिला!

अन् पुन्हां माझ्या मनांत आलें कीं, जरूर तो पैसा हातीं असल्यामुळें, स्वतःच्या मुलीसहि दुसऱ्याकडे ठेवून, काय वाटेल त्या अडचणी दूर करून, मी इंदिरेची हौस पुरी करूं शकलों. मनोहरला हौस नव्हती कां? पण हौस मारावी लागली त्याला!

कोणालाहि वाटेल तेव्हां मदत करायला बांधला गेलेला नव्हतों मी—शिवाय मी कोणी एखादा जहागिरदार नव्हतो कीं मनांत आलें रे आलें कीं लगेच कोणालाहि वाटेल तेवढी मदत करूं शकलो असतो मीं. पण मनोहर माझा एक जिवाभावाचा स्नेही होता आणि मला आपलं वाटत होतं सारखं कीं, त्याला त्यावेळीं तरी जरूर ती मदत करणें, आणि त्यायोगें त्याची हौस मारायची टाळणें, शक्य नव्हतें कां आपणांला? अन् तशी मदत करायचा मी धीर केला असता तर....पण केला नाहीं, आतां काय त्याचें?

दुसऱ्याच्या दृष्टीनें फारसें महत्व नाहीं ह्या गोष्टीला, पण आयुष्यांतील साधेसाधे प्रसंग सुद्धां हळुवार मनानां हलवून सोडतात कधीं कधीं......

एक सबंध पावसाळा आधींच खाल्ल्यामुळें जुनाटच झाली होती छत्री ती. अन् इंदिरेनें संमेलनाच्या वेळीं वापरल्यानंतर ती परत करावयाची तशीच राहून गेली होती आजपर्यंत.

आणि ती छत्री आज इतक्या दिवसांनीं पुन्हां दृष्टीस पडल्या-बरोबर तो सारा इतिहास आणि प्रसंग जशाच्या तसाच नजरेपुढून सरकून गेला. माझ्या—दुखावलेल्या पायाला खडा लागला कीं जशी बारीकशी कळ येते तशीच कांहींशी कळ पुन्हां मस्तकांतून हिराहिरून गेली, आणि मी एक उसासा सोडला !

# प्रामाणिक

रस्त्यावर लोकांची जा—ये चालली होती. बाजारांतून आणावयाच्या वस्तूंची यादी शक्य करीत होती आणि ती पुरी होईपर्यंत बाहेरच्या गॅलरींत उभा राहून मी लोकांच्या जा-येची गंमत बघत होतों. माहितीचे वा बिनमाहितीचे बरेच डोळे माझ्या डोळ्यांशीं भिडत होते आणि जरूर तिथें ओळखीच्या स्मिताची देवाण घेवाणहि चालली होती इतक्यांत—

इतरांसारखाच तो एका बाजूनें दुसऱ्या बाजूस चालला होता. सहजच वा बुद्ध्या ना कळे, पण त्यानें वर दृष्टि टाकली-त्याची माझी नजरानजर झाली—ओळखीचें प्रतीक म्हणून मी त्याजकडे बघून जरा हंसल्यासारखें केलें, पण केवळ शिष्टाचार म्हणून सुद्धां हास्याला प्रतिहास्य मिळालें नाहीं; उलट किती क्रुद्ध नजरेनें त्यानें मजकडे बघितलें ह्या वेळींहि पण.

वास्तविक तो कांहीं माझा शत्रु नव्हता. त्याचें माझें कधीं भांडण झालें नव्हतें. स्वप्नांतसुद्धां त्याचा कधीं हेवादावा केला नाहीं मीं. आणि तरीसुद्धां गेले कांहीं दिवस कांहीं गैरसमज झाला असल्यास

तो दूर व्हावा ह्या सद्भावनेनें एवढेंच काय पण ' जगामध्यें माणसा-माणसांमध्यें वैमनस्य असावेंच कां मुळीं ? ' असें माझें प्रामाणिक मत असल्याकारणानें, तो ज्या ज्या वेळीं अलीकडे माझ्या नजरेस पडे त्या त्या वेळीं मी नेहमींच त्याच्याकडे बघून स्मित करीं, प्रति-स्मिताची, प्रत्युत्तराची, प्रतिसमेटाची अपेक्षा करीं, पण....जरा आणखी पुढें जाऊन स्वतः होऊन आपण त्याच्याशीं दोन शब्द बोलण्यास सुरवात करण्यापूर्वींच तो आपल्या मुद्रेवर माझ्याबद्दल अशा तऱ्हेचा तिरस्कार दाखवी कीं आम्हीं दोघे एकमेकांचे किती जन्मांचे वैरी होतों जणुं !

तो कांहीं माझा नातेवाईक वा निकटचा परिचित नव्हता. पण त्याची माझी पुष्कळ वेळां ट्रॅममध्यें गांठ पडत असे. तो आपीं फार बोलत नसे, पण तो जें काय बोले तें इतकें उठावदार बोले कीं त्याच्यासारखें आपणांस बोलतां आलें असतें तर--असें मला कांहीं-तरी खचित वाटत असे.

खरें म्हणजे एका साध्या प्रसंगानेंच त्याची माझी प्रथम ओळख झाली. खिशांतून कांहीं कागद चिठ्ठ्या वगैरे बाहेर काढून त्या चाळीत असतांना एक महत्वाचा कागद खालीं पडलेला माझ्या ध्यानांत आला नव्हता. तो त्या वेळीं समोरच्या बाकावर बसला होता. त्यानें तो कागद उचलून मजबळ दिला. अगदीं क्षुल्लक का होईना पण उपकारच होता तो एक. आणि तेव्हांपासून आमची शब्दांची देवाणघेवाण सुरू होऊन त्याला किंचितसें मैत्रीचें स्वरूप आलें होतें.

एका कंपनींत पैसेवसुली, पगारवाढ अशासारखीं पैशाशीं सारखा संबंध येणारीं जबाबदारीचीं कामें त्याला करावीं लागत. स्वतःच्या पगाराव्यतिरिक्त अवांतर द्रव्यप्राप्ति करून घेणें अशक्य नव्हतें त्याला; पण तो म्हणे कीं वाममार्गानें मिळविलेला पैसा टिकत नाहीं;

सहजासहजीं पचत नाहीं, तो टिकवणारांच्या आणि पचवणारांच्या अंगीं तडफहि तशीच लागते. तसली तडफ आणि ताकद आपणांमध्यें नाहीं, अर्थातच अधिकाची आशा उगीच कशासाठीं बाळगायची आपण?

त्याचा माझा ह्या विषयावर पुष्कळ वेळां वादविवाद होई. जगाची छाननी करायचें आपण ठरविलें तर जगामध्यें शेंकडा ऐशींहून अधिक लोक अप्रामाणिकपणावर जगत आहेत....सत्य, धर्म, देव.... बोलायच्या गोष्टी आहेत ह्या—केवळ तत्त्वें आहेत तीं—व्यवहार त्यांहून अगदीं भिन्न असतो....पुण्याच्या गाडींत बसतांना तिकिट काढण्यास वेळ न मिळाल्याकारणानें प्रामाणिकपणानें मी गार्डास सांगण्यास गेलों असतांना व रेल्वेचे जरूर तेवढे पैसे देत असतांनाहि त्या गार्डानें खडकी स्टेशनवर मला बाजूस बोलावून खडकी ते पुणें असे तिकीट माझ्या हातीं देऊन 'तुम्ही रेल्वेला दोन तीन रुपये भरण्यापेक्षां मला फक्त एक रुपया द्या म्हणजे व्यवहार संपला' असें केवढ्या अल्प वेळांत आणि किती युक्तीनें त्यानें मला सुचविलें.... अन् मलाहि तें फायद्याचें वाटून मीं तो माझा मुंबई ते पुणें हा प्रवास किती प्रामाणिकपणानें केला तो प्रसंग त्याला मीं जसाच्या तसा सांगितला. तलाठ्याकडे वा बेलिफाकडे कारणपरत्वें मला जाण्याचे प्रसंग आले असतांना केवढा मोठा प्रामाणिक व्यवहार ते लोक करतात हें मी त्याला स्वानुभवानें सांगितलें. कायद्याचा आणि पुराव्याचा प्रश्न निघाला तर हे प्रामाणिक मार्तंड कधींच सांपडले जायचे नाहींत हें निर्विवाद. पण लेखन ही जशी कला, चित्र काढणें ही जशी कला, ताजमहाल तयार करणें ही जशी कला तशी पद्धतशीर अप्रामाणिकपणा हीहि एक कलाच आहे म्हणून मी वादाची एक बाजू घेऊन जरा अट्टाहासानेंच त्याला सांगत असें.

पण त्याला तें पटत नसे. व तो म्हणे कीं, पैसा म्हणजे किप

असतें. व तें केव्हां बाधेल याचा नेम नाही. आणि त्यांतल्या त्यांत सार्वजनिक किंवा खजिनदाराच्या ताब्यांतला पैसा म्हणजे जहरांतलें जहर....त्याला नुसता स्पर्श करा, सत्यानाश करून टाकील तुमचा तो. व माझ्या स्वतःच्या हातून पैशाची एवढी उला ढाल रोज होत आहे. पण डोळ्यांत नुसतें तेल घालून काम करावें लागतें.

एक दिवस असें घडलें कीं, कचेरींत अंगांतील कोट खुर्चीच्या मागल्या बाजूस टांगून ठेवून मी इतरत्र कुठें तरी हिंडत होतों. चारचे सुमारास चहावाला पैसे मागण्यास आला असतांना खिशांत हात घालतों तों माझें पैशाचें पाकीटच कोणी चोरलें होतें.

प्रश्न असा होता कीं, चोरीची वर्दी शांतिसंरक्षक खात्यास द्यावी अगर नाहीं. कर्मधर्मसंयोगानें पाकिटांत त्या दिवशीं नोटा व नाणें मिळून सुमारें ११८ रुपयांचा ऐवज होता. ११८ रुपये म्हणजे कांहीं लहान सहान रक्कम नव्हती. पण माझें आपलें मत असें होतें कीं, आपण स्वतःच्या पायाशीं आधीं मांडावें. चूक प्रथम माझी होती. व तें पाकीट कोटाच्या खिशांत मीं ठेवावेंच कशाला? अन् ठेवलें तर कोट काढून बाहेर हिंडत कां राहिलों मी? स्वतःस जपावें आणि दुसऱ्यास यश द्यावें.

मला पुष्कळांनीं पुष्कळ आग्रह केला. व मी कोणाचें कांहींच ऐकलें नाही. व ही बाब शांति संरक्षण खात्याच्या हातीं गेली कीं, आपल्याच मित्र--मंडळींना अधिक त्रास होईल, व असा मी युक्तिवादहि केला. एकूण ११८ रुपयांची चोरी पचलीच म्हणायची त्या वेळीं.

अन् ही हकीगत त्याला सांगून मीं केलें तें बरोबर केलें कां चूक म्हणून त्याचें मत मीं त्याला विचारलें. व त्या वेळीं त्यानें माझ्या विरुद्ध निकाल दिला. चोरीला, अप्रामाणिक पणाला तुम्ही उत्तेजन

देऊन समाजाचें नव्हे, समाजांतील प्रत्येक व्यक्तीचें तुम्ही थोडें फार नुकसान केलें आहे. व कचेरींतल्या कचेरींत पैसे जातात याचा अर्थ काय? गुन्ह्याचा तलास लावण्याचे प्रयत्न व्हायला पाहिजेच होते. व लबाडांना असें मोकाट सोडलें तर दुसरा गुन्हा करण्यास ते साहजिकच प्रवृत्त होतील. धांमिकांना, अप्रामाणिकांना जबरदस्त शिक्षा झाल्याच पाहिजेत.

एकूण गाडींतल्या गाडींत कां होईना त्याचा माझा केव्हां केव्हां जो वाग्विवाद, जें संभाषण होई त्यावरून त्याच्याबद्दलचा माझा आदर वृद्धिंगतच होत असे. इतका शान्त, कर्तव्यदक्ष आणि पापभीरु मनुष्य क्वचितच माझ्या आढळण्यांत आला असेल पूर्वी.

आणि असा हा मनुष्य, कीं ज्याच्याशीं माझी अजून दृढ मैत्री झालेली नसली तरी ती तशी व्हावी अशी मी मनांतल्या मनांत अशा बाळगून होतों तो मनुष्य एकाएकीं. मीं स्वतः त्याची कोणत्याही प्रकारची आगळीक केली नसतांना माझा एवढा तिरस्कार कां आणि कसा करूं लागला हें मला समजत नव्हतें. तें एक आश्चर्यांतलें आश्चर्यच होतें माझ्या मतें!

चुकून या वृद्धाचा त्यानें कधीं माझा अपमान केला नव्हता पूर्वी, अन् मी तर त्याचा अपमान करणें शक्यच नव्हतें. मग हें झालें कसें हें एक मोठें कोडें होतें—नव्हे मला नखून सखूर सलत असणारें शल्य होतें तें एक....मी जों जों त्यावर विचार करूं लागेल, तों तों माझी मति अधिकच कुंठित होई...कां न कळे, पण त्याच्या त्या तिरस्कृत नजरेनें एक प्रकारची भीतिच वाटूं लागे मला.

कार्यकारणभाव किंचितहि उलगडत नसला तरी कोणत्या क्षणीं त्याची बदलती वृत्ति माझ्या प्रथम अनुभवास आली तो क्षण मला स्मरत होता. केवळ दोन महिन्यांपूर्वीचाच प्रसंग तो. त्यापूर्वी दोन

तीन महिने तो मला गावींत कधींच भेटला नव्हता. माझी वापरती टोपी जरा जुनाट होऊन कुठेंशीं फाटूंहि लागली होती म्हणून नवीन टोपी खरेदी करण्याकरितां मी टोप्यांच्या दुकानांत गेलों होतों. दुकानांत गिऱ्हाईकांची गर्दी बरीच होती, पण एकहि गिऱ्हाईक रिते जाऊं नये म्हणून दुकानदार साऱ्यानांच खूष करण्याचा व्यापारी प्रयत्न करीत होता. इतक्यांत—

त्या अनेक गिऱ्हाईकांत तो आज बरेच दिवसांनीं म्हणजे उण्यापुऱ्या तीन महिन्यांनीं एकदम माझ्या नजरेस पडला.

साहजिकच मीं त्याच्याकडे बघून स्मित केलें आणि तिथें मला प्रथम कांहीं विचित्रता दिसून आली.

तो हंसला नाहीं. दुकानदाराशीं तो खरेदी करीत असलेल्या टोपीच्या किंमतीविषयींच बोलत राहिला.

मला वाटलें टोपी खरेदी करण्याच्या नादांत त्याचें मजकडे लक्षच गेलें नसेल; दुकानांत जमलेल्या अनेक गिऱ्हाईकांतला मी एक होतों. लक्ष नसल्यास माझ्या स्मिताला प्रतिजबाब कसा मिळेल आणि म्हणून किंचित् जवळ सरकून मीं त्याच्या नजरेला नजर लावून पुन्हा जरा हंसल्यासारखें केलें आणि म्हटलें, " अं, कसं काय चाललं आहे हल्लीं ? कुठं गडप झाला होतांत ? कुठं हवा खायला गेला होतांत गेले तीन महिने ? "

किती सहजतेनें आणि उल्हासानें मीं प्रश्न विचारला होता त्याला आश्चर्याचा धक्काच बसला मला! पहिल्यानें त्याच्याकडे बघून मीं स्मित केलें त्या वेळीं त्याचें मजकडे लक्ष नव्हतें अशी मुळींच वस्तुस्थिति नव्हती. त्यानें मला पाहिलें होतें. मी हंसलों हेंहि त्याला समजलें होतें. पण बुद्ध्याच समजून उमजून त्यानें मजकडे उलट पाहण्याचें टाळलें होतें. कारण दुसऱ्या वेळीं अधिक जवळ जाऊन त्याला 'कसं काय चाललं आहे आणि कुठं हवा खायला गेला होतात

तीन महिने ?' म्हणून सलगीचा प्रश्न केला त्या वेळीं त्यानें स्मितानें तर माझ्या स्मिताची परतफेड केलीच नाहीं; उलट त्याच्या कपाळावर आंठी चढली. कधींहि न पाहिलेला तिरस्कार त्याच्या मुद्रेवरील रंध्रारंध्रांत दृश्यमान होऊं लागला आणि कधींहि न ऐकलेला न अनुभवलेला तो प्रतिजबाब–नव्हे प्रतिप्रश्न–"कां ? तुम्हांला काय करायचं आहे ?"

समोर आरसा होता ! खेटर मारूनहि वाईट होणार नाहीं इतका वाईट चेहरा झाला माझा. खरे म्हणजे सभ्यतेला आणि शिष्टाचाराला सोडून असलेला त्याचा तो जबाब ऐकून इतर गिऱ्हाईकही आम्हांकडे विचित्रतेनें पाहूं लागले !

कल्पनातीत अपमान झाला ! माणुसकीच्या मर्यादा उल्लंघून त्यानें मला नामोहरम केलें. मस्तक जरासें सुन्न होऊन मी घरीं परतलों.

आणि तेव्हांपासून कमींत कमी पांच वेळां तरी त्याची माझी पुन्हा नजरानजर होण्याचे प्रसंग आले असतील. त्यानें तसें कां केलें ह्याची मीमांसा मला लावता येत नव्हती. त्याचा आपण कुठें नकळत अपराध वा आगळीक केली असल्यास आपण वेळप्रसंगीं त्याची क्षमाहि मागण्यास तयार होऊं; पण मित्र म्हणून समजत असलेल्या माणसानें शत्रूपेक्षांहि वाईट वर्तणूक आपणांशीं कां करावी ह्या गोष्टीचा बोध करून घेण्याची मला नुसती तळमळ लागून राहिली होती आणि म्हणून स्वतःचा अपमान तात्पुरता गुंडाळून ठेवून, ज्या ज्या वेळीं तो माझ्या नजरेस पडे, त्या त्या वेळीं जरा कृत्रिमतेनें कां होईना पण पुन्हां मैत्रीचें स्मित माझ्या मुद्रेवर मी त्याला दाखवीं. हेतु हा कीं, म्हणजे तरी कांहीं स्पष्टीकरण त्यानें करावें अन् गैरसमज दूर व्हावा.

पण जितकें वेळां मी त्याच्याकडे बघून हंसण्याचा आणि त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला तितकें वेळां त्यानें आपल्या मुद्रेवर

वाढता तिरस्कारच दाखविला—तो माझ्याशीं अजूनहि बोलण्यास तयार दिसत नाहीं. आणि आतां तर माझी खात्री झाली आहे कीं अखेरपर्यंत त्याचे माझे संबंध असेच राहणार !

कारण आतां मला साऱ्या गोष्टींचे धागेधोरे जमवितां आले आहेत. ज्या कंपनींत तो नोकर होता त्या कंपनींत जबरदस्त पैसे खाणारा इसम तो एकटाच होता आणि तीन एक महिने मध्यंतरी तो जो मला दिसत नव्हता त्याचें खरें कारण असें होतें कीं कुठें तरी पकडला जाऊन खरोखरीच दोन अडीच महिने तो येरवड्याची हवा खाऊन आला होता !

मी ज्या वेळीं मैत्रीच्या सलगीनें टोपीच्या दुकानांत त्याला विचारलें होतें कीं "कसं काय चाललं आहे हल्लीं ? कुठं गडप झाला होतात ? कुठं हवा खायला गेलां होतांत गेले तीन महिने ?" त्या वेळीं त्याची अशी कल्पना होती कीं एरवीं प्रामाणिकपणाची बढाई मारणाऱ्या ह्या इसमाला पैशाच्या अफरातफरीबद्दलच दोन महिन्यांची सजा झाली होती. ही गोष्ट मला माहीत असून मीं त्याचा उपहास करण्याकरतां म्हणूनच त्याला तसा प्रश्न विचारला होता !

आणि म्हणूनच त्याचा मजवर जास्तीत जास्ती राग होता.

# शेजारधर्म : : १

धर्माची बंधनें, धर्माचे नियम, धर्माच्या व्याख्या आपणास अनेक ठिकाणीं वाचावयास वा ऐकावयास मिळतात. पण शेजारधर्मावर एखादा आधारभूत असा ग्रंथ कांहीं उपलब्ध नाहीं. कुटुंबाकुटुंबाचा एकेक गट जरी स्वतंत्र राहत असला तरी एकेका चाळींत, एकेका वाड्यांत जीं कांहीं कुटुंबें जवळ जवळ राहत असतात त्यांच्यामध्यें मैत्रीचे, स्नेहाचे असे कांहीं संबंध जमत असतात कीं त्यांना एक-मेकांशीं प्रत्येक बाबतींत त्रयस्थासारखे, परक्यासारखें वागतां येत नाहीं. त्यांचे एकमेकांशीं वागण्याचे कांहीं नियम ठरून जातात आणि ह्या अलिखित नियमांना वा पद्धतीला शेजारधर्म असें म्हटलें जातें.

काका आणि मी शेजारीं राहत होतो. त्याचा आणि आमचा त्या मानानें खूपच परिचय.... ते वयानें माझ्यापेक्षां मोठे होते. ते व मामी मला विनोदानें जांवई म्हणुन संबोधीत. वास्तविक नीला कांहीं त्यांची मुलगी नव्हती, पण घरोब्यानें कितीतरी नातीं निर्माण होत असतात! नीलेला मामी आपली लेक समजत–

लेकीचा यजमान म्हणजे जांबई—असा मी काकांचा आणि मामींचा जांबई झालो होतो !

काका आणि मामी दोघहि माणूसवाणी, एकलकोंड्या स्वभावाची नव्हती. दोघांनाहि माणसें हवीशी वाटत. माझा आणि नीलेचाहि स्वभाव त्यांच्याशीं जुळता असे. आमच्याकडेसुद्धां कितीतरी लोकांची जा ये असायची– अर्थातच सतत सहवास आणि स्वभाव साधर्म्य ह्यामुळें काकांच्या घराचे आणि आमच्या घराचे संबंध त्या मानानें जास्तींच सलगीचे होते. त्यांत कांहीं विशेष नव्हतें.

एवढें होतें तरी मी मात्र नीलेला नेहमीं म्हणायचा कीं नीले, लक्षांत ठेव बरं, अतिपरिचयादवज्ञा....अतीची माती होत असते.... सलगीची दोरी अधिक ताणली तर काय होईल कल्पना आहे ना?

पण मी असें का व कशाकरितां म्हणतो हें समजून घेण्याच्या भानगडींत नीला पडत नसे, उलट ती मला म्हणे बरं, बरं, माहीत आहे मला तें....”

प्रेमळ पतिपत्नींचा गोड वाद तो, माझें म्हणणें ती ऐकत नव्हती किंवा तिच्या प्रतिकाराला मी प्रतिकार करीत नव्हतो. आणि त्याचें कारण असें होतें कीं त्यावेळीं ती बाब इतकी क्षुद्र आणि क्षुल्लक होती कीं तिला कांहीं महत्त्व देण्याची आवश्यकताच नव्हती तेव्हां. पण अधूनमधून माझें तें मत मी नीलेला बरेंच वेळां ऐकायला लावी आणि तिचा तो “बरं, बरं ...चा मुरका आणि मान वेळावणें पाहण्यांत गंमत मानी.

काका आमच्याकडे येत, मामी येत, नीला काकांकडे जाईच – त्यांची मुलगीच ती—पण मी मात्र ... मामींची आणि काकांची नेहमींची तक्रार म्हणजे मी होऊन त्यांच्या घरांत फारसा जात नाहीं – कारणाशिवाय तर नाहींच नाहीं—मी त्यांच्याकडे जाण्याचे प्रसंग शक्यतों टाळतो – आणि कांहीं अंशीं हें खरेंहि होतें. माझ्या-

कडे एवढे लोक येत, मी त्यांना बोलावीत असे, मीहि वेळप्रसंगीं कोणाकोणाकडे जात असे पण काका एवढे शेजारी, आणि एवढे परिचयाचे असतांना त्यांच्याकडे माझें जाणेंयेणें त्यामानानें फारच मर्यादित असे. आणि तोच मामींचा माझ्यावर मोठा रोष होता — निदान तसं त्या बारंबार नीलेजवळ बोलून दाखवीत असत.

मी असा का वागत होतो त्याला कारणेंहि तशीच होती! शितावरूनहि भाताची परीक्षा करतां येते—- टेहेळणीच्या आणि संशोधनाच्या नजरेनें बघितलें कीं दृष्यमान सृष्टीच्या मागील भाग पुष्कळ वेळां माणसाच्या ध्यानीं येऊं लागतो आणि दिसतें तसें नेहमींच नसतें — पिवळें दिसलें कीं सोनेंच तें असा निष्कर्ष काढणें चुकीचें होय हें माणसाच्या प्रत्ययास येऊं लागतें.

माझा अशा तऱ्हेचा कांहीं ग्रह होण्याला पहिलें कारण असें होतें कीं काका आमच्या शेजारीं रहावयाला आले त्यापूर्वी ते जेथें राहत होते तेथेंहि त्यांना शेजारी, आमच्या सारखे शेजारी होतेच. त्यापैकीं एक शेजारी सहजच माझ्या ओळखीचा झाला होता. आमचा आणि काकांच्या घराचा जेवढा घरोबा होता तेवढा किंबहुना थोडाफार अधिकच घरोबा काकांचा आणि त्या शेजाऱ्याचा एकाकाळीं जमला होता वाटतें! तो इतका कीं त्याची बायको माहेरीं गेली होती त्यावेळीं तो जेवण्यास खाणावळींत न जातां काकांच्या घरींच जेवत असे. तोहि काकांचा आणि मामींचा त्यावेळचा जांवई होता असे त्याच्या तोंडूनच ऐकलें होतें.... अन् पुढें केव्हां तरी अतीची माती व्हायची ती झाली— मामींचें आणि त्या शेजाऱ्याच्या बायकोचें कशावरूनसें भांडण झालें—प्रकरण विकोपास गेलें—तें मामींनीं विकोपास नेलें वाटतें. आणि त्या भांडणाचे परिणाम इतके भयंकर झाले कीं एकाकाळचे जिवश्चकंठश्च स्नेही एकमेकांचें कट्टे द्वेष्टे बनले एकमेकांस पाण्यांत

पाहूं लागले. एकमेकांनें दर्शन झालें तरी विटाळ झाला असें समजून मामी आंघोळ करण्याची इच्छा दर्शवूं लागल्या.

मामींच्या बोलण्यांत त्या भांडणाचे पडसाद पडलेले कितीतरी वेळां आम्ही ऐकत असूं, मला आश्चर्य वाटे कीं, मामींची गोष्ट सोडून दिली तरी, काकासुद्धां त्या त्यांच्या शेजाऱ्याबद्दल आपल्या बोलण्यांत उपहास आणि अनादर दाखवीत ! जो एका काळीं तुमचा मित्र होता आणि ज्यांच्या प्रत्येक कृतींत तुम्हांस एकाकाळीं गुणांचा सांठा आढळे त्याच्याच प्रत्येक कृतींत नव्या नव्हे, त्यावेळच्याच—तुम्हांला आतां दोषच कसें दिसूं लागले ? पूर्वीच्या चांगल्या गोष्टी भांडण झाल्याबरोबर वाईट कसं लागल्या ही विचित्रता त्या गोष्टी होत्या तशाच होत्या पण तुमची बघण्याची दृष्टि आतां बदलली—विकृत झाली—असाच ह्याचा अर्थ नाहीं का ? असें बोलून दाखविण्याचें पुष्कळ वेळां माझ्या मनांत....पण मी निग्रह करी कीं बाण सोडणें सोपें असतें—पण सोडलेला बाण परत घेणे अशक्य असतें !

आणि अशी पूर्वभूमिका असल्यामुळें मी कितीहि मनांत आणलें तरी माझ्या वागणुकीवर त्याच्या परिणाम खचित झाला होता. मी काकांशी आणि मामींशी बोले---पुष्कळ बोले— पण प्रत्येक शब्द मोजून आणि विचार करून बोलायचा--भीति वाटायची कीं आपण कांहीं पघळपणानें बोललो—अर्थाचा अनर्थ झाला, काका आणि मामी त्या शेजाऱ्यासारखीं आमच्याबरोबर केव्हांतरी भांडूं लागली तर मग त्यांचें मागून शत्रू होण्यापेक्षां आधींच जपून वागलें तर काय बिघडलें ?

मी फारच बारकाईनें काकांच्या आणि मामींच्या हालचाली कृति आणि बोलणीं निरीक्षित होतो.

तसें करण्यांत माझा एक उद्देश होता. काका आणि मामी आपणांशीं

एवढी आपुलकी दाखवितात, शेजारधर्म पाळूं पाहतात, पण त्यांच्या आपूलकीच्या आणि मैत्रीच्या मर्यादा वाटतात तेवढ्या विस्तृत आहेत कां ? त्यांत कांहींतरी, कुठेंतरी उणीव, कृत्रिमता नाहीं कां ? त्यांत देखावा आणि आभासच अधिक नाहीं कां ? मैत्री करायची आणि मांडायचं, शेजारधर्म पाळायचा आणि मग केव्हां तरी तो मोडायचा असाच त्यांच्या शेजारधर्माचा प्रकार आणि प्रघात नसेल ना ?

अर्थात् प्रत्यक्ष आधाराशिवाय एवढा मोठा निष्कर्ष काढणें बरोबर नव्हतें. आणि म्हणूनच काका मामींच्या मैत्रीला मी प्रत्यक्ष विरोध करीत नव्हतों—शेंकडा शंभर टक्के नसलें तरी बरेच टक्के मी स्वतःहि शेजारधर्म पाळीत असेच असे—आणि त्यामुळेंच मूलतः, नीलेला माझें मत आणि मन संपूर्णपणें समजावून देण्याचें मी मनावर घेतलें नव्हतें अजून.

गंमत अशी होती, कीं ज्या ज्या वेळीं नीला शेजारधर्म मर्यादेबाहेर पार पाडीत आहेसें मला दिसे त्यावेळीं मी तिला थोडा इषारा देऊं लागे पण तिला तें कांहीं पटत नसे--उलट ती मलाच ज्ञानाचे घुटके पाजूं लागे कीं, "माणसांत राहायचं म्हणजे माणसासारखं व्हावं लागतं—तीं माणसं एवढी आपुलकी दाखवितात—आपल्याकडे एवढी येतात. आपणाला बोलावतात—तुम्हीं तितक्या मोकळेपणानें त्यांच्याशीं वागत नाहीं—कसला तरी आणि कांहींतरी आडपडदा ठेवतां—चांगलं नाहीं कांहीं हें—त्यांच्याकडे आपण होऊन एकदां गेलात मोकळेपणानें बोललांत तर किती बरं वाटेल त्यांना ! मी त्यावर म्हणे—"मी काय त्यांच्याकडे जात नाहीं ?"

"तसं नाहीं—पण त्यांची अशी कल्पना झाली आहे कीं तुम्हीं त्यांच्याशीं तितकं सलगीनं बोलत नाहीं—त्यांना पाहिजे तसा मान देत नाहीं..."

" मला अशा तऱ्हेचा मान द्या म्हणून कोणी मान देत नसतं—मान आपल्या कृतीनें आणि आचरणानें मिळवावयाचा असतो ..."

.. असा वादविवाद केव्हां तरी सुरू होई आणि केव्हां तरी संपेहि !

*　　*　　*

अगदीं साधा आणि क्षुल्लक प्रसंग होता तो. टेबलावरचा विजेचा दिवा मी विकत घेण्याचा बेत करीत होतो. काका त्या दिवशीं माझ्या घरीं बसले होते. मी त्यांना दिव्याला हल्लीं किंमत किती पडेल म्हणून सहजच विचारिलें, त्यांना माहीत असलेली किंमत त्यांनीं मला सांगितली—आणि त्यांना काय वाटलें कुणास ठाऊक ते चटकन् घरांत गेले आणि एक तारेची दोरी आणून ते मला म्हणाले " हीं तुम्हांला ठेवा–स्पेअर आहे ही—आमच्याकडे दुसरी आहे.... टेबलाचा दिवा आज संध्याकाळीं आणून टाका...."

ती "वायर" विजेची तार आमच्याकडे ठेऊन काका घरीं गेले.

नीलेला माझ्यावर भडिमार करावयाला संधि मिळाली....—" आपण त्यांना वायरचे पैसे देण्याचा प्रयत्न करूं, पण बघा केवढी आपुलकी दाखवतात ते...."

" उतावीळ समंधा, जरा शांत रहा " नीलेच्या तोंडावर हात धरून मी जरा हळूंच उद्गारलो. कारण मी खिडकींतून जरी बाहेर बघत होतो तरी माझे कान काकांच्या घराकडे होते. त्यांच्या घरांतील कुरबूर मला ऐकूं येत होती—" ही वायर देऊन टाकायचं कांहीं अडलं होतं का ? " मामी काकांना रागवून बोलत होत्या.

" अग पण ती नुसती पडून आहे आपल्या घरांत...."

" तशा पुष्कळ गोष्टी पडून आहेत—म्हणून काय अशा देऊन टाकायच्या कीं काय ? निदान मला आधीं विचारायचं तरी होतात ? "

आवाज खालीवर होत. तो वादविवाद निदान तीन चार मिनिटें तरी चालला होता—मी तिकडे लक्ष नाहींसें दाखवीत होतो—पण माझें सारें लक्ष तिकडेच होतें—आणि जरा आश्चर्यच तें—मामींची माल आमचेकडे आली आणि म्हणाली कीं, "नाना, काका म्हणतात कीं तुमच्याकडे त्यांनीं सवाशीं जी वायर ठरली, ती आम्हांला पाहिजे आहे...."

"ती ने का...." मी त्या वायरला अजून हातहि लावला नव्हता माल वायर घेऊन गेली आणि दार लोटून घेऊन मी नीलेनें नाक ओढलें—

"कसला धर्म पाळितलास तूं! हा शेजारधर्म, का पत्नीधर्म का पत्नी-प्रेम--बोल आतां."

माझ्या शर्टाचें बटन गरगर फिरवीत नीला माझ्याकडे बघत म्हणाली--"खरंच, कसं काय हे?"

काकांनी ती वायर कुणास देऊं करण्यांत मोठा गुन्हा केला होता असं नव्हे, आणि तो गुन्हा असता तरी त्या गुन्ह्यापेक्षां ती तार परत नेण्यांत मात्र खरोखरीच त्यांचें मोठें शौर्य होतें—धाडस होतें---शेजारधर्माचें खरें स्वरूप त्यांत सांठवलेलें होतें. पण त्याही-पेक्षां मला आश्चर्य वाटलें तें हें कीं काका इतके दुबळ्या मनाचे कसे? आपली कृती धर्मपत्नीला मान्य झाली नाहीं म्हणून तिच्या सांगण्याखातर स्वतःच्या शब्दांची चाडहि बाळगावयाची नाहीं का?

अर्थात् वरीलसारख्या प्रसंगांना किंचितहि महत्त्व न देतां आम्हीं आमची मैत्री आणि शेजार—धर्म किंचित्‌हि विचलित होऊं दिली नव्हती! आतां फरक फक्त एवढाच झाला होता कीं, माझ्यासारखीच नीलाहि आतां जरा जपून वागत होती.

काकांकडे कांहीं पाहुणीं आलीं होतीं. त्याचा सर्कसला जाण्याचा बेत झाला. मुलें वरींच जमलीं होतीं. बेबीला पाठवा म्हणून काका

आणि मामींनीं नीलेला सांगितलें. किंचित्‌हि विरोध न दाखवितां नीला म्हणाली, "घेऊन जा कीं तिला!"

बेबी त्यांच्याबरोबर सर्कसला गेली. काकांना पैसे चांगले मिळत होतें. माझीहि मासिक प्राप्ति कांहीं कमी नव्हती. बेबीच्या तिकिटाकरितां किती पैसे खर्च केले त म्हणुन विचारणें म्हणजे शेजार–धर्म मोडण्यासारखें होतें. बेबी सर्कस बघून आली---आम्हीं पैशाचा प्रश्न काढण्याचा क्षुद्रपणा दाखविला नाहीं.

अन् एक दिवस माझ्याकडे माझे कांहीं निवटक मित्र जेवावयास यावयाचे होतें. स्वयंपाकीणबाई बोलावली होती—परंतु आयत्यावेळी तिची कांहीं अडचण निघून ती येऊं शकत नाहीं म्हणुन तिचा निरोप आला. बेत तर मोठा आखला होता. घरांतील एवढी यातायात नीलेला एकटीला होणें शक्य नव्हतें. पण नीला मला म्हणाली---

"मामीनां मदतीला बोलावीन—कांहीं घाबरायला नको....मामी येतील....शेजार–धर्म तो काय मग !"

आणि मग आम्ही त्या बाबत मोकळेपणानें चर्चा केली. पण काकांना, मामीनां आणि त्यांच्या तिन्ही मुलांना आपण जेवायलाच बोलावलं तर...म्हणजे त्यांना घरीं आणि येथें दोहीकडे त्रास करावयास नको....पण मग आम्हांस वाटलें कीं, त्यांचा स्वयंपाक एव्हांनां शिजूंहि लागला असेल....शिवाय, एवढ्या उशिरा कोणास जेवावयास बोलावणें कांहीं बरें दिसत नाहीं....एकूण नीलेनें पदर खोंचला——मामींना हांक मारून तिनें अडचणीची कल्पना दिली—मामी म्हणाल्या, "आतां झपझप माझं उरकते, आणि येते....!" शेजार–धर्म म्हणून मामी खरोखरच नीलेच्या मदतीस आल्या.

एक दोन तासांची मदत नीलेस पुरेशी झाली--माझे मित्र आले, आमचें जेवण एकत्र व्हावयाचें होतें- मामी निघून गेल्या,

आमची जेवणें निर्विघ्नपणें पार पडलीं—मामींच्या शेजार—धर्माबद्दल मी मनांतल्या मनांत त्यांना धन्यवादच दिला !

संध्याकाळीं आमचा अचानक सिनेमास जावयाचा बेत ठरला. नीलेला मी सहजच म्हटलें—की "बेबीबरोबर मामींची मुलेंहि येत असली तर पहा—मामींना विचार—" नीलेला कल्पना पसंत पडली. तिनें लगेच मामींकडे जाऊन "मुलांना आम्हीं सिनेमास नेत आहोंत बरें का" म्हणून जरा अधिक आपुलकीनें सांगितलें.—

पण मामी मुलांना धाडण्यास तयार नव्हत्या....काका घरांत नव्हते, त्यांना विचारलेलें नाहीं....मनांत नसलें म्हणजे नसलेलीं कारणेंही पुढें करतां येतात. मला आश्चर्य वाटलें कीं, त्या दिवशीं दिव्याची तार आपणास न विचारतां का दिली, असा प्रश्न करून ती परत आणावयास लावणारी ही धाडशी बाई, आज मुलांना आमचेबरोबर पाठविण्यास काकांच्या परवानगीची जरूरी आहे, म्हणून अभिनय करते ही एक गंमतच नाहीं का ?

मुलें मोठ्या आशेनें नीलेकडे आणि मामींकडे बघत होतीं—ह्या वादांत अखेरीस आपला फायदा होतो अगर नाहीं, आपणांस सिनेमास यावयास मिळतें अगर नाहीं. इकडे त्यांचें लक्ष होतें—आणि शेवटीं हो ना करतां करतां त्यांनीं मुलांना आमचेबरोबर येण्यास परवानगी दिली. आम्हीं सिनेमास गेलों—फॅमिली सर्कल-मध्यें बसलों. सिनेमा बघितला—सिनेमांतील गाणीं, सिनेमांतील विनोद वगैरे संबंधीं बोलत बोलत मुलें परत आलीं—मला जरासें बरें वाटलें.

× × ×

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मी घरीं परत आलों तों नीला जरा, अस्वस्थ मनानें कॉटवर निजून राहिली होती. रोजच्यासारखी

खिडकीत ती माझी वाट बघत उभी नव्हती. स्टोव्ह पेटवून चहा तयार करण्याची उत्सुकताच दाखविली नाहीं तिनें आज!

"काय ग, आज काय होतय काय तुला?" व मी तिला ताप आला आहे कीं काय हें बघून म्हटलें —

ती बराच वेळ मजजवळ बोलेनाच...जरा वेळानें तिनें मला सांगितलें,

"आज मोठं भाडण झालं माझं!"

"छान झालं, पण कुणाबरोबर ते? आणि कां आणि कसं!" मी उतावीळ होऊन विचारलें.

"मामींबरोबर..."

"अं?" मी अधिकच आश्चर्य वाटून उद्गारलो.

मग नीलेनें सारा कांहीं इतिहास सांगितला. मामी दुपारी आमच्या घरीं आल्या होत्या. त्यांचा आजचा नूर कांहीं निराळाच होता. त्यांचें डोळे आणि चेहरा रागीट दिसत होता— त्यांनीं आपल्या हातांत कांहीं पैसे आणले होतें—एक रुपया अकरा आणे —त्यांनीं नीलेच्या हातांत ठेविले. हे कसले पैसे, मामी? नीलेनें नेहमींच्या लडिवाळपणानें विचारलें—क्षण दोन क्षण पुन्हां रागीट मुद्रेनें बघून मामी म्हणाल्या कालच्या सिनेमाचे....मामी, बा: म्हणून नीला पैसे मामींना परत करूं लागली—आणि एकदम लाव्हारस बाहेर येऊं लागला—मामींनी इतका कांहीं कहर सुरू केला कीं, बोलाण्याची सोय उरली नाहीं. आम्हीं त्यांच्या मुलांना काल सिनेमाला नेलें होतें. तें शेजारधर्म म्हणून नव्हे तर दुपारीं मामींनीं नीलेला पाकसिद्धी करण्याकरितां जी मदत केली होती त्यांचा मोबदला म्हणून, त्याची किंमत किंवा परत फेड म्हणून आम्हीं रात्रीं मुलांना सिनेमाला नेलें होतें. असा त्यांचा निष्कर्ष आणि निर्णय होता. त्या नीलेला नाहीं नाहीं तें बोलं लागल्या—

आम्हीं मजूर नाहीं—आम्हीं स्वयंपाक करणाऱ्या बायका नाहीं—शेजारधर्म म्हणून आलें मी—मला जर कल्पना असती कीं, कोणच्याना कोणच्या कारणानें तुम्हीं अशी मजुरी आम्हांस देणार आहांत तर मी मुळीं दुपारीं आलेच नसते.!

सहनशीलतेलाहि सीमा असते. नीलेनें प्रथम सगळें ऐकून घेतलें, पण मग तिला राहवलें नाहीं. तीहि चिडली आणि तिनें मामींना म्हटलें कीं, " मामी, आमच्या बेबीला तुम्हीं परवां सर्कसला नेलं होतंत त्याचे पैसे आम्हीं तुम्हांला कधीं विचारले होते कां ? सर्कसचें आणि सिनेमाचें तिकीट तें काय ? तुम्हांला कांहीं कमी नाहीं—आम्हांला कांहीं कमीं नाहीं; पण कांहीं शेजारधर्म आहे कीं नाहीं ? हे एक रुपया अकरा आणे द्यायचे असतील तर त्यांतून बेबीच्या सर्कसचे पैसे कापून घ्या....आणि घरांत जाऊन जेवढ्या मिळून शिव्या, शाप द्यायचे असतील तेवढें द्या आम्हांला—इथें नको आतां जास्ती—झालं तेवढं फार झालं—तुमचं माझं भांडण झालं हें संध्याकाळीं कळलं तर तें खरंसुद्धां वाटणार नाहीं. त्यानीं मला कितीतरी वेळां बजावलं होतं कीं, जपून रहा....पण प्रत्येक वेळीं मी त्यांना वेड्यांत काढीत होतें; पण अखेरीच मीच शेवटीं ह्या प्रहसनांत अक्कलशून्य ठरलें—शेजारधर्म म्हणजे काय हें चांगलंच शिकवलेंत तुम्हीं मला आज, मामी...."

पण ह्यावर मामींना अधिकच जोर आला. मी त्यांच्याकडे फार फार जात नाहीं—मला काकांची किंमतच नाहीं—मी त्यांना क्षुद्र लेखतो त्यांच्या काय तोंडांत येईल तें, त्या बोलत होत्या. नीला म्हणाली—" तुम्हांला काय बोलायचं असेल तें मला बोला—पुरुषांना कशाला गोवतां त्यांत ?"

पण त्यांच्या मतें मीच तर सर्व गोष्टींना कारणीभूत होतो. त्यांच्या तोंडाची कंड्र शमत नव्हती—त्यांची बडबड चालूच होती—

मग मात्र नलिचा राग अनावर झाला. तिनें मामींना सांगितलें कीं, "मामी तुम्हीं शेजारधर्माचा केवढाहि मोठा पसारा आरंभि-लांत तरी तुम्हांला खरं कोणी पहिल्यापासून ओळखलं असेल तर तें माझ्या माणसांनींच....गळ्यांत गळे घालण्यापर्यंत मैत्री वाढवायची आणि मग गळें कापायला निघयाचं असें करण्यापेक्षां शेजारधर्माच्या मर्यादा जरा निश्चित केल्या व असले प्रसंग घडणार नाहींत अशी खबरदारी आधीपासूनच काळजी घेतली तर तें बरें नाहीं कां? ही त्यांची मला नेहमीं शिकवण असतें. मी त्यावर आजपर्यंत विश्वास ठेवीत नव्हतें एवढचं....त्यांनीं मला पुढेंहि बजावलं होतं कीं, तुम्हीं तुमच्या त्या मागल्या शेजाऱ्यांशीं जश्या भांडलांत तसं केव्हां तरी आणि कधीं तरीं माझ्याशीहि भांडाल; पण मी त्यांच्या शब्दाला आजपर्यंत कधींच किंमत दिली नाहीं आणि म्हणून तुम्हीं आज जें काय बोलत आहां तें ऐकायची माझ्यावर पाळी आली आहे...."

तणतण करीत मामी घरांत निघून गेल्या.

"झालं ना आतां समाधान? "कान टोंचायला सोनारच लागतो" मी नीलेला म्हटलें.

"अतां मला कांहीं आणखी चिडवूं नका, बाई" नीला माझा माझा हात ओढून म्हणाली"

"चिडवीत नाहीं........पण झालं हें कांहीं बरं झालं नाहीं.... जसं अतीची माती होतें म्हणून मी म्हणतों, तसंच पाण्यांत राहून माशाशी वैर असणं चांगलं नव्हे असंहि माझं मत आहे...."

"तें सगळं मला कळतं....मी कुठं वाकडं धरलं आहे? मी त्यांना आणखी अर्ध्या तासांनीं हांक मारली...."

"आल्या त्या?"

"आल्या, आणि मी त्यांना सांगितलं कीं मामी, तुम्हीं मला बोलूं नये ते बोललांत मीहि तुमच्या उणिवा काढल्या....आपण

शेजारी शेजारी राहत आहोंत........तुमच्यावाचून माझं चालायचं नाहीं, माझ्यावांचून तुमचं चालायचं नाहीं....तुम्हीं विसरा, मी विसरते....चला आपण जरा बाहेर जाऊन येऊं...."

"आणि खरोखरीच आम्ही बाहेर वीरेश्वराच्या देवळांत जाऊन आलों"

"शाबास, हें मात्र छान केलंस ... आतां खरा तुला शेजारधर्म कळला असं मी म्हणेण..."

"तें खरं....पण त्यामुळें खरं का समाधान झालंय कुठें? डोकं मात्र दुखूं लागलंय....अजूनसुद्धां थांबल नाहीं तें ..."

काका आणि मामी यांचे आमचे संबंध होते तसेंच मित्रत्वाचे आहेत. मौज अशी आहे कीं, नीलेनें मला सर्व हकीगत सांगितली तशी त्या भांडणाची वा वादविवादाची संपूर्ण हकीगत मामींनी काकांच्या कानीं घातली असलीच पाहिजे. काकांचा किंवा माझा एकमेकांशीं वादाचा असा एकहि प्रसंग आला नाहीं. आम्हीं दोघेहि एवढंच नव्हे, तर एकीकडे मी व नीला व दुसरीकडे काका व मामी एकमेकांशीं बोलतांना आणि वागतानां जणुं कांहीं झालेंच नाहीं अशा वृत्तीनेंच वागतो. पण, दुधानें ओठ भाजले कीं ताकसुद्धां फुंकून पितात म्हणतात त्या न्यायानें कोणचीहि गोष्ट करतानां त्यांत कोणच्याहि तऱ्हेनें काकामामींचाच नव्हे तर कोणाहि शेजाऱ्याशीं संबंध येत असेल तर तीन वेळां विचार करूनच ती आम्हीं करतो. शेजारधर्माची व्याख्या, शेजारधर्माचें महत्व, आणि शेजारधर्माच्या मर्यादा मामींनीं आणि काकांनीं आम्हांला चांगल्याच शिकविल्या आहेत !

## उपकारांची फेड : : १०

उपकारांची फेड अपकारांनीं करण्याइतका नैतिक गुन्हा करण्यास माणूस उलट्या-काळजाचा असावा लागतो. मी उलट्या-काळजाचा माणूस खचित नाहीं. मनाचा मोठेपणा असो अगर दुबळेपणा, कमकुवतपणा असो; पण दुसऱ्याची आपल्या हातून आगळीक होऊं नये म्हणून मी अहर्निश झटत असतो, आणि ती झालीच तर तिचें परिमार्जन होईपर्यंत मला झोंप येत नाहीं. अर्थातच् उपकारांची फेड अपकारांनीं करण्यापर्यंत माझ्या मनाची मजल केव्हां जाईल हें माझ्या स्वप्नींहि येत नाहीं. आणि असें असून सुद्धां....

त्या संस्थेमध्यें मी उणीपुरी दोनतीन वर्षें तरी काम करीत होतो. ती संस्था एकाकाळीं फार भरभराटीस आलेली होती. पण अलीकडे ८—१० वर्षें ती निकृष्टावस्थेस चालली होतीसें दिसत होतें. खरं म्हणजे मी एक उत्साही तरुण म्हणून रिसवुडांनीं मला प्रथम कार्यकारी मंडळांत घेतलें होतें. रीसबूड जवळजवळ वीस वर्षें संस्थेचे मुख्य चिटणीस होते. चिटणिसाच्या दोन जागा असत. दोघांचे अधिकार सारखेच असत; पण नवीन मनुष्याला माहिती कमी अस-

णार त्याअर्थी जुना तो मुख्य व नवा तो त्याचा सहकारी, मदत-नीस चिटणीस अशी प्रथा पडून गेली होती

मी संस्थेंत शिरल्याबरोबर संस्थेची हीन अवस्था होण्याचीं कारणें शोधूं लागलों. समासद कमी होतात, ते वाढण्याची वा वाढविण्याची गोष्ट तर दूरच राहिली....कारणें सांपडल्यानंतर त्यांत सुधारणा कशी करतां येईल हाहि मजपुढें एक विचाराचाच प्रश्न होता.

पहिली एक दोन वर्षें मी एकाकीच किती उत्साहानें काम करीत होतो! घरचे आणि जीवनाचे व्यवसाय संभाळून संस्थेचें काम करावयाचे म्हणजे मला फारच त्रास व्हावयाचा....पण तो मी सहन करीत होतो.

हळूंहळूं मला माझ्यासारखेंच चार दोन तरुण मित्र येऊन मिळाले. ते जरी निवडलेले सभासद नव्हते, तरी त्यांच्या सहकारानें मी माझें काम जोरानें आणि जलदीनें करूं शके.

आणि आम्हांस आतां संस्थेच्या उणीवा, संस्थेच्या अडचणी, संस्थेच्या ऱ्हासाचीं कारणें संपूर्ण अवगत झाली होती. संस्थेच्या वार्षिक निवडणुकी म्हणजे एक हास्यास्पद प्रकार होता. किमान सभासदहि हजर नसल्याकारणानें सहसा वार्षिक सभा तहकूब व्हावयाची व अखेरीस निवडणुकीच्या सभेंत जेवढे लोक हजर असावयाचे त्याहून, व्यवस्थापक मंडळांत, नियमाप्रमाणें निवडावयाच्या लोकांचा आंकडा अधिक असल्यामुळें तेथें हजर नसलेले लोकच निवडून यावयाचे. थोडक्यांत, कुठें एखाद-दुसरा नवा सभासद घेऊन बाकीचे सर्व जुनेच सभासद पुन्हां निवडून येत.

वास्तविक, त्यांतहि कांहीं वावगें होतें असें नव्हे. पण वस्तुस्थिति अशी होती कीं, जुने लोक जे वार्षिक सभेससुद्धां हजर राहण्याची कळकळ दाखवित नाहींत ते संस्थेची वर्षभर व्यवस्था बघण्यास लायक ठरतात कां, हा मुख्य प्रश्न होता. दुसरें कुणी नाहीं म्हणून

त्यांचीं नावें दप्तरांत असूं द्यावयाची, हा युक्तिवाद आम्हां नवीन रक्ताच्या लोकाना पटत नव्हता. संस्थेंत सजीवता नव्हती. संस्थेंत आकर्षकता नव्हती. नवीन कार्यक्रम आंखून, नव्या नव्या मंडळींना-मुलाना आणि तरुणाना संस्थेबद्दल आदर वाटेल, नव्हें संस्था आपलीच आहे ही जाणीव होईल, असें काहींतरी करावयास पाहिजे होतें.

आमची खात्री झाली कीं, रिसबूड आणि त्याचे चार-दोन सहकारी ह्यानीं संस्था आजपर्यंत टिकवून धरून नावानें का होईना पण जिवंत ठेवली होती. त्यांच्या वयाप्रमाणें, शक्तीप्रमाणें आणि बुद्धीप्रमाणें त्यानी संस्थेकरता काहींतरी केलें होतें निश्चित. परंतु, त्यात एकच मुख्य उणीव होती, ती ही कीं, तरुणांशीं तरुण-रक्ताशीं सहकार करावयाचें, तरुणाशीं समरस होण्याचें मुख्य कार्य त्यांच्या कल्पनेमध्यात येत नसे, त्याना पटत नसे किंवा काय असेल तें असो; जुने विचार, जुन्या चालीरीति, परंपरेला चिकटून राहण्याचा अट्टाहास हाच मला वाटतें झगडा होता तो-तेंच खरें संस्था खालावत जात असल्याचें मुख्य कारण होतें आमच्या मतें! आम्हीं मित्रमंडळींनीं ह्यावर अगदी संपूर्ण विचारविनिमय केला. आम्हीं पुढल्या वर्षाची निवडणूक निराळ्याच तऱ्हेनें करावयाची म्हणून ठरविलें. आमच्या बरोबरच्या अनेक तरुणाना आमच्या कल्पना समजावून सांगितल्या त्याना वर्गणीदार करून घेतलें, तीन-चार महिन्यानीं वार्षिक निवडणूक व्हावयाची त्यावेळीं नवीन विचाराचें कार्यकारी मंडळच निवडून आलें पाहिजे .. घर अस्वच्छ झालें, कीं प्रथम त्याला केरसुणी मारावी लागते-पोळिष्टवें, जळमटें साफ झटकावी लागतात .जुना बुरस साफ नाहींसा करून संस्था नावाला आणावयाची वगैरे बेत आम्हीं निश्चित केले. निवडणुकीत सहसा आपणास विरोध होणार नाहीं. पण कुणी सांगावें, झालाच तर....

आम्हीं केलेल्या प्रत्येक नव्या सभासदाजवळ योजलेल्या सभासदांचीं नांवाची यादी देण्याचें आम्ही ठरविलें होतें.

आणि ह्याच सुमारास एक चमत्कारिक आपत्ति माझ्यावर आली होती व कुठें एका ठिकाणीं एका क्षुल्लक कारणांवरून एका डगलेवाल्याशीं किरकोळ शब्दाशब्दी झाली होती. मला कल्पनाहि नव्हती कीं, त्याचें पर्यवसान माझ्यावर खटला भरण्यांत होणार होते म्हणून. प्रसंग अगदीं साधा होता.

मी माझ्या दुसऱ्याच कांहीं मित्रांसह स्टेशनवर चहा पीत होतो. रात्रीची वेळ होती. आणि काहीं एका विनोदी वाक्प्रयोगावरून आम्हाला हंसूं आलें. त्या शांत वेळीं तें हंसणें कदाचित् जरा मोठ्यानें झालें कीं काय न कळे; पण जवळच उभ्या असलेल्या एका डगलेवाल्यानें आम्हाला हटकलें आणि म्हटलें—" अरे ए, हंसता केवढ्यानें ! "

" अं, हंसलो म्हणून काय झालं ? " एका मित्रानें डगलेवाल्याला प्रति प्रश्न केला.

" असं का ! " डगलेवाला रागावलासा दिसला. " तुमची नाव द्या पाहू .. "

आणि आम्हीं आपलीं नांवें त्याला भराभर सांगितलीं. ती त्यानें लिहून घेतली .आम्हाला वाटलें आपल्या अधिकाराचें नाटक करण्याचा हा एक प्रकार असावा !

पण ज्यावेळीं आम्हाला ' समन्स ' लागलें त्यावेळी आम्हांला समजलें कीं, शाहण्या माणसानें डगलेवाल्यापासून चार पावले दूरच राहणें बरें. कारण आमचा अपराध काय तर आम्हीं मोठ्यानें हंसलो, आणि त्यावर आम्हांवर खटला भरला होता, त्याचीं कारणें दिली होती कीं, आम्हीं रात्रीच्या वेळीं दंग्याचे चाळे करून शाततेचा भंग केला

होता. व इंडियन पीनल कोडाच्या अमूक अमूक कलमान्वयें आम्हीं गुन्हेगार होतो.—

रिसबूड वकील होतें—नांवाजलेले वकील होतें. त्यांना मी सर्व हकीगत सांगितली. ते म्हणाले, ह्या खटल्यांत कांहींच अर्थ नाहीं. तूं काहीं काळजी करूं नकोस... डगलेवाल्यांच्या साक्षीदारांची नांवें फक्त प्रथम मला आणून दे...

बाह्यतः नाहीं, पण मनातल्या मनांत मी घाबरलोंच होतो. गुन्हा शाबीत होईपर्यंत कोणीहि गुन्हेगार ठरत नाहीं हें सर्व ठीक होतें; पण [illegible] सुध्दा आपणावर काम चाललें जावें, ही एक नामु[illegible] गोष्ट होती; पण त्याला नाइलाज होता. कुणाच्या हातुन बुध्दचा अशी ही गोष्ट झालीच नव्हती—आयुष्यामध्यें लहानमोठ्या आपत्ति माणसांवर येतच असतात. त्यापैकींच बारीकशी ही एक आपत्ति होती! [illegible] मोटार ड्रायव्हर, क्लीनर वगैरे जे काय ४।५ निरर्थक लोक डगलेवाल्यानी साक्षीस ठेवलें होतें, त्याची नांवनिशीवार संपूर्ण यादी रिसबुडाना मी देऊन टाकली.

आमचा खटला पहिल्या दिवशीं चाललाच नाहीं. डगलेवाल्याचा एकहि साक्षीदार हजर नव्हता. आम्हाला नाहक खेप मात्र पडली. आम्हांला शिक्षा होईल न होईल, पण डगलेवाल्याचा इंगा काय असतो हें [illegible]ण्याच्या इर्षेनेंच जणुं डगलेवाल्यानें दुसरी तारीख मागून घेतली.

प्रसंग असा होता कीं, संस्थेतून जुनें वातावरण आमूलाग्र नाहींसें करण्याकरिता म्हणुन आमच्या मित्रमंडळींच्या बैठकी होत होत्या. कार्यक्रम निश्चित होत होते—नवीन समासद कोण कोण असावेत ह्यासंबंधीं चर्चा होत होत्या, आणि त्यावेळींच आमचा खटलाहि

चालू होता. डगलेवाल्याला आरोपीच समजून जणुं रिसबूड वकील डगलेवाल्याची साक्ष घेत होते !

[illegible] शांतता भंग झाली ? स्टेशनमास्तर, तिकिट कलेक्टर, कोचिंग क्लार्क वगैरे मोठाल्या माणसांस साक्षीस न बोलावतां रस्त्यावरच्या मोटारींत झोपलेले ड्रायव्हर व क्लिनर तुला साक्षीदार मिळाले काय ? एक ना दोन, अनेक प्रश्न . . . रिसबुडांच्या प्रभावी व दरडावणीच्या फेरतपासणींत डगलेवाल्याच्या तळपायालासुद्धां घाम फुटला बहुतकरून.

माझी मात्र जरा चमत्कारिक मनस्थिति होती. रिसबूड वकील जीर्ण-पंथीय होते. मिरासदारी पद्धतीची त्यांची चिटणिशी इतरांबरोबरच संपुष्टांत आणण्याचें आमच्या मित्रमंडळींनीं ठरविलें होतें. आणि इकडे तर रिसबूड माझा खटला स्वखुषीनें चालवून माझ्यावर उपकारांचे डोंगर तयार करीत होते ! मी माझ्या मित्रमंडळींना म्हटलें कीं, आपण एवढें लोक आंत शिरत आहोंत—एकट्या रिसबुडांना सध्या राहून दिलें तर....

पण माझें म्हणणें त्यांना मान्य होत नव्हतें. नव्या युगाचा, नव्या वर्षाचा, नवा दिन. ..सारं कांहीं नवीन....एकदां ठरलं तं ठरलं ! मी जमविलेल्या मित्रमंडळीमध्यें नवा उत्साह इतक्या मोठ्या प्रमाणांत सळसळत होता कीं, आतां माझें म्हणणें ऐकण्यासहि ते तयार नव्हते. पाऊल पुढें टाकायचें—आतां रेसभरसुद्धां मागें यावयाचें नाहीं !

आणि खटल्याचा निकाल लागला ! आम्हांला संपूर्ण निर्दोषी ठरवून, न्यायमूर्तींनी डगलेवाल्यावरच कडक टीका केली होती—न्यायालयाचा आणि आरोपी कीं जे गांवातील थोडेफार जबाबदार तरुण म्हणून ओळखले जातात त्यांचा—असले खटले भरून कालापव्यय झाल्याची न्यायमूर्तींनी आपल्या निकालपत्रांत तक्रार नमूद केली होती !

जरी इतर सर्व लोक 'आम्ही निर्दोषी म्हणून सुटायचेच' म्हणून म्हणत होते, तरी तशा तऱ्हेचा निकाल देण्याचे संपूर्ण श्रेय माझ्या मतें रिसबूड वकिलानाच होतें ! कुणी [illegible] [illegible] किरकोळ वकिलाने तें काम चालविलें असतें. आणि डगलेवाला घाबरला नसता तर एखादे वेळी निकाल उलटहि लागला असता ! रिसबुड वकिलांचा मी खचित त्या बाबतीत ऋणी होतो !

मग त्या रात्रीच मी त्याच्या घरीं गेलों.

" काय सुटलास ?

" हो, तुम्हीं सोडवलंतच "

" बरं झाल, चला "

" बरं, [illegible], आतां तुमची फी सांगा पाहूं, मी पैसे बरोबर आणले आहेत."

" फी-बी कांहीं नाहीं ! "

" असं कसं ? तुमचा तो धंदा आहे ! "

" पण मी धंदेवाईक ह्या नात्यानें हें काम चालविलेलेंच नाहीं."

" तें असूं द्या, पण तुम्ही कांहींतरी मोबदला, भेट म्हणून घेतलंच पाहिजे !"

" अरे तूं माझ्याबरोबर आज एका संस्थेंत काम करतो आहेस. ठेव ते पैसे खिशात ? "

आणि मला दोनतीन दिवसानंतरचें चित्र दिसूं लागलें.... ज्या संस्थेसंबंधी रिसबुडांनीं उल्लेख केला त्यासंस्थेशी त्यांचा संबंध दोनतीन दिवसानीं तुटावयाचा होता !

" आणि कायरे, तुम्ही म्हणे त्या दिवशीं आम्हां म्हाताऱ्यांना हुसकावून लावणार आहात ? पोरवडा करणार की काय संस्थेंत ? "

तो पोरवडा नव्हता—कार्य न करणाऱ्या लोकांचे जागीं कार्य करणारे यावयाचे होते. मानाचे मानकरी नव्हते, ते कामाचें काम-

करी होते ते—वगैरे कितीतरी मी रिसबुडांना पूर्वी सांगितलें असतें; परंतु तो प्रसंग असा होता की, त्यावेळीं मनाच्या कोलाहलामध्यें सांपडून वादविवाद करण्याच्या स्थितींत मी नव्हतों !

" मी थोडेसं ऐकलं आहे—पण माझी चिटणीस म्हणून राहण्याची अजून उमेद् व इच्छा आहे आणि मी चिटणीस राहणारच. . ."

विचित्र मनःस्थितींतच मी घरीं परतलों ! वार्षिक निवडणुकीच्या दिवशीं एवढी गर्दी संस्थेच्या इतिहासांत कोणी पाहिली नव्हती अजून ! आमच्या मंडळींनीं नवीन करून घेतलेले सभासद सारेच्या सारे ठरल्याप्रमाणें आले होतेच; पण त्यांना योग्य प्रतिकार करण्याच्या इराद्यानें [illegible] आपले लढवय्ये आणले होते. लटलट कांपत, सोटे टेंकीत व पगड्या सावरीत किती वृद्ध जमले होते तिथें ! विरुद्ध पक्षाचें लोक आलेंच तर किती येतील ह्याचा अंदाज करूनच आम्ही आमच्या सभासदांची संख्या ठरविली होती म्हणून बरें झाले, नाहीतर आमचा तो पोरवडा असेंच संबोधण्यात आलें असतें खचित् !

सभेस सुरवात झाली. निवडणुकीस आरंभ झाला. आमच्या पक्षानें कामाची स्पष्ट विभागणी करून ठेवली होती कोणी कोणी अध्यक्षाचें नाव सुचवावयाचें, कोणी चिटणीसाचें, कोणी सभासदांचे हें सारें ठरलें होतें. त्यात व्यक्तीच्या आवडी-निवडीचा प्रश्न नव्हता. लष्करी शिपायाच्या शिस्तीनें आपणावर आलेलें काम पार पाडावयाचें, अशी सर्वांस सक्त ताकीद् होती. आणि योगायोग असा होता कीं, चिटणिसांच्या जागाच्या सूचना करण्याचें काम माझ्याकडे होतें!

सभेचा रागरंग अशा थाटाचा आणि एवढ्या थराला जाणारा असेल ही रिसबुडाना कल्पनाच नसावी. इतक्या पगड्या आल्या तर त्या सहजच पुरतील अशीच त्यांची समजूत असावी. कारण तें सारें वातावरण बघून ते रागावल्यासे दिसत होते !

चिटणिसांच्या जागेच्या निवडणुकीची वेळ आली आणि हातां तील आठवणीचा कागद उघडून मी उभा राहणार तेवढ्यांत एकानें आधींच सूचना केली कीं, आहेत तेच चिटणीस नवीन वर्षाकरितां असावेत. त्याला लगेच अनुमोदनहि मिळालें.

अर्थातच आमच्या पक्षानें ठरविलेलीं नांवें मला उपसूचना म्हणून सुचवणें प्राप्त झालें.

मी उठलों—रिसबूड वकील किंचित् आश्चर्यानें तर किंचित् क्षोभानें मजकडे बघत होतेसा मला भास झाला.

मी दोन्हीं नांवें वाचलीं.

त्यांत रिसबूड वकिलाचेंहि नांव नव्हतें व माझेंहि नव्हतें—माझें नांव कार्यकारी मंडळांत टाकलेलें होतें.

निवडणूक अधिक त्रासदायक व्हावी म्हणूनच जणुं आणखी कोणी आणखी कांहीं नांवें सुचविलीं....बाजूनें आणि विरुद्ध अशी भाषणेंहि सुरू झालीं—रिसबूड वकील मजजवळ जें म्हणाले होते तें खरोखरीच त्यांनीं सभेस सांगण्यास सुरवात केली—"मी आज वीस वर्षें चिटणीस म्हणून काम करीत आहे. माझी चिटणीस म्हणून राहाण्याची अजूनहि इच्छा आहे, मला उमेद आहे...."

पण त्यांचें म्हणणें ऐकून घेण्यासहि कोणी तयार होतेसें दिसलें नाहीं.

"लॉइड जॉर्ज मागल्या महायुद्धांत दोस्तांचा मुख्य प्रधान होता, म्हणून काय ह्या महायुद्धांतहि त्याला कोणी मुख्य प्रधान करील होय ? त्याची पुष्कळ इच्छा असेल...." मागून एकानें भाष्य केलें.

"रिसबुडांनीं चिटणीस म्हणून राहाण्याचा हव्यास धरण्यापेक्षां, गोष्टी सांगेन युक्तीच्या चार—असा कांहीं उपक्रम केला तर त्यांच्या हातून संस्थेची अधिक सेवा होईल आतां...." आणखी एक आवाज !

शिस्तीचा भंग होतो म्हणून उसळत्या रक्ताला बंधारा घालावा लागला....बोलणारांना खालीं बसण्याची खूण केली—ते खालीं बसलेहि.

निवडणुकी झाल्या-एकहि जुन्या मनाचा आणि जुन्या मनाचा मनुष्य अधिकारी मंडळात शिल्लक राहिला नाही. पुरोगामी गटानें चीत्कार केला—वृध्दांचा, आपल्याच वडील माणसांचा तो पराजय होता; पण नव्या-जुन्याचा समन्वय घालण्याचा धीर जोंपर्यंत जुन्याना होत नाहीं, वयानें म्हातारे झाले तरी मनानें व विचारानी जोंपर्यंत त्याना तरुण राहतां येत नाही तोंपर्यंत असले अनिष्ट प्रसंग क्रमप्राप्तच होत हें आम्हास समजत होतें. जुन्याचा पराभव केला, रिसबूड वकिलाचा आम्हीं—मी—पराभव केला हें जरी तात्विक आणि [illegible]नें सपूर्ण समर्थनीय होतें, तरी पर्यायानें उपकार करणारावर अपकार करण्याचा नैतिक गुन्हा माझ्या हातून त्यावेळी खचित घडला होता. ह्याची मला जाणीव होती आणि माझ्या अनेक शल्यापैकीं तें एक शल्य ठरून गेलें होतें !

## मैत्रीच्या मर्यादा : : ११

"....त्यांचीं शल्यें त्यांनांच बोचत आहेत सध्यां ?" किती लहान वाक्य हें ! विश्वासनें तें वाडांजवळ उच्चारलें आणि कांहीं जिज्ञासेनें वाडांनीं तें मला सांगितलें....पण तें ऐकून किती बेचैन आणि घायाळ झालो मी ! इतर शल्यांपेक्षां फारच जोरानें तें मला बोंचून टोंचून गेलें !

विश्वास माझा मित्र होता. तो माझा मित्र आहे. व तो तसा राहिलहि, एवढ्याशा लहान वाक्यानें व प्रसंगानें त्याच्यां-माझ्या मैत्रींत खंड पडूं देण्याइतका कमकुवत मनाचा मीं खचित नाहीं; पण तरीहि माझ्या मनांत येतें कीं, तो असें कां व कसें म्हणाला ?

त्याचा-माझा प्रथम फारसा परिचय नव्हता; पण कुणाचे कुणाशी कसे परिचय होतात ! ह्याचा जर आपण आढावा घेऊं लागलो तर कितीतरी मजेदार आणि चटकदार प्रसंग आपल्या नजरेस पडतील ! आमच्या गांवीं एका हौशी मास्तरांनीं एक मासिक काढावयाचें ठरविलें होतें. स्थानिक एक लेखक म्हणून मास्तरांनीं साहजीकच माझ्याकडून लेखनसाहाय्याची अपेक्षा केली

होती. आयुष्यांतील बारीक-सारीक प्रसंग माणसास केव्हां केव्हां टोचत बोचत राहतात व अस्वस्थ करतात. अशा प्रसंगाचे चित्रीकरण करून हळूं हळूं तो एक संग्रह तयार करावयाचा व त्याला शल्यें हें नाव द्यावयाचें असें त्यावेळीं मी योजिलें होतें —अर्थातच मास्तरांनीं ज्या वेळीं मजकडून लेखनमजकुराची अपेक्षा केली, त्यावेळीं मी एका प्रसंगाचें लगेच चित्र रंगविलें. एका शल्याचें हस्तलिखित मास्तरांच्या ताब्यांत देऊन टाकलेंहि. ती गोष्ट माझ्या शल्यें नांवाच्या नियोजित संग्रहातील एक शल्य असल्यामुळें मी गोष्टीच्या शेवटीं तशा अर्थाची एक एक टीप लिहून काढली होती; आणि ह्याच वेळीं विश्वासचा माझ्याशीं परिचय होण्याचा योग आला ! मास्तराचें मासिक ज्या छापखान्यात छापावयाचें ठरलें होतें त्या छापखान्याचा तो व्यवस्थापक होता.

मास्तराचा अंक प्रसिद्ध झाल्यानंतर व त्यांत माझें एक शल्य छापून आल्यानंतर, विश्वासनें मास्तराजवळ मजविषयी चौकशी केली वाटते. त्याची-माझी भेट झाली. तो बोलका मी बोलका. प्रथम भेटींतच मैत्रीची बीजें रोवली गेली. आमच्या बरेंच वेळां भेटी गाठी होऊं लागल्या. मास्तराचें मासिक तीन-चार महिन्यातच पैशाच्या अभावीं बंद पडलें, तरीहि त्याचे-माझें संबंध वाढतच होते.

आमचा स्नेह वाढण्यास मुख्य कारण असें होतें कीं, त्यावेळीं माझी एक-दोन पुस्तकें प्रकाशित झालीं होतीं, त्याचेंहि एक पुस्तक बाहेर पडलें होतें, 'समानशीले व्यसनेषुसख्यं' म्हणतात ह्या न्यायानेंच बहुतकरून आम्हीं एकत्र येत जात होतो.

पुढें तर योगायोग असा आला कीं, माझें बिऱ्हाड बदललें. माझें घर त्याचें घराचें अगदीं नजीक आलें. मी त्याला निकटचा मित्र समजूं लागलों. निरनिराळ्या विषयावर आमच्या चर्चा होत.

एकमेकांचीं मतें व आवडीनिवडी एकमेकांस आतां कळूं लागल्या. अगदीं चुलीपर्यंत शिरकाव होण्याइतकी आमची मैत्री वाढली !

विश्वासनें आणि मी एकमेकांशीं एवढें मित्रत्वाचें नातें जोडलें होतें व आम्हीं भेटूं त्यावेळीं मनमोकळेपणानें बोलत असूं, तरी त्याच्या-माझ्या स्वभावांत व दृष्टिकोनांत एक मोठा महत्त्वाचा फरक असे. विश्वासमध्यें माझ्यामतें एक मोठा दोष होता, तो त्याला स्वतःला दोष असें पटत असेल कां नाहीं कोणास ठाऊक; पण तो त्याचा एक स्वभाव-विशेष होता; आणि तो हा कीं, त्यानें अमूक माणसाला किंवा व्यक्तीला चांगलें म्हटल्याचें माझ्या स्मरणांत नाहीं. तो जें काय पाहील, ऐकेल वा अनुभवील, त्यांपैकीं त्याला पसंत किती हें ऐकण्यापेक्षां त्याला नापसंत किती हेंच इतरांना अधिक ऐकायला मिळे ! प्रत्येक गोष्टींतील वैगुण्य आणि उणीवा शोधून काढण्यांत त्याचा हातखंडा असे. अनेकांवर अनेक कठोर टीका लिहिल्या होत्या त्यानें. त्या सगळ्याच सार्थ आणि समतोल बुद्धीनें लिहिल्या होत्या असें नव्हे, पण अमूक लेखक वाईट, तमूक लेखक वाईट, सगळेच वाईट म्हणून मोठमोठ्या साहित्यिकांबद्दलसुद्धां तो म्हणूं लागला कीं, एखादें वेळीं विनोदानें मी त्याला म्हणावयाचो कीं विश्वास, तूंहि एक लेखकच आहेस, तूं स्वतःसाहि त्याच कोटींत टकलतोस, का स्वतःला एकट्याला महाराष्ट्राचा एकमेव लेखक समजतोस ?

ह्याच्या उलट माझें मत असें कीं, प्रत्येक गोष्टीस चांगल्या आणि वाईट अशा दोन्ही बाजू असतात. त्यांतील वाईट भागाकडे बघून नाकें मुरडत बसण्यापेक्षां त्यांतील चांगल्या भागाचें अवलोकन करीत राहिलें तर हरकत कोणती ? बरे वाटेल तेवढें घ्यावें, बाकीचें टाकून द्यावें. अंब्याचा रसच खावयाचा असतो, साली-बाटींना महत्त्वच द्यावयाचें नसतें.

विश्वासला लिहावयाची हौस होती. त्याचा वाचन-अभ्यासहि बऱ्यापैकीं होता असें दिसत होतें. त्याच्या हातीं एक सबंध छापखाना होता. त्याचें एक पुस्तक त्यानें स्वतःच्या छापखान्यांत छापून प्रकाशित केलेंहि. त्याचे लेख मुद्रणावस्थेंत असतानां किंवा तत्पूर्वीहि वाचण्याचें भाग्य मला लाभत असे. तो आपले लेख मजकडे आणावयाचा, मला वाचावयास द्यावयाचा, मजकडून वाचूनहि घ्यावयाचा, आपल्या लेखावर माझें मत काय म्हणून माझ्या अभिप्रायाची तो आतुरतेनें वाट बघत असे.

मला जें काय वाटे तें मी स्पष्ट सांगत असे. माझ्या स्वभावास अनुसरून त्याच्या लेखांतील दोषांना प्राधान्य न देतां, त्यांत अमूक अमूक चांगलें आहे अगर अमूक अमूक मुद्दे आणखी पाहिजेत अशा तऱ्हेच्या विधायक सूचना मी करीत असे. माझ्या अभिप्रायाचा त्याला फार मोठा उपयोग होत असेलच असें नाहीं; पण कुणालाहि स्वतःच्या कृतीचें कौतुक झाल्यानें समाधान आणि आनंद वाटत नाहीं का ? तशा तऱ्हेचा आनंद मी त्यास खचित उपभोगूं देत होतो.

त्या बाबतींत मला राहून राहून एक आश्चर्य मात्र वाटत असे. तें हें कीं, हा गृहस्थ दुसऱ्यांवर नेहमीं टीकेची धार धरून तयार, पण स्वतःच्या बाबतींत दुसऱ्यांकडून सहानुभूतीची आणि इष्ट अभिप्रायांची अपेक्षा करतो तरी कसा ? त्याच्या इतरांवरच्या टीका त्याच्या स्वतःच्या लिखाणांवर लावल्या तर मला एखादें वेळीं अशी भीति वाटे कीं; दुसऱ्याचें कुसळ दिसणें आणि स्वतःचें मुसळ न दिसणें ही म्हण खरोखरीच कोणी त्याला व्यंजोक्तीनें एखादें वेळीं अहेर करणार नाहीं ना ?

दुसरें असें कीं, ज्यावेळीं तो स्वतःचे लेख, स्वतःचीं पुस्तकें, स्वतःची प्रसिद्धि ह्यासंबंधीं मजजवळ बोलत असे, त्यावेळीं मीहि एक लेखक होतो ह्याची मला वाटतें, तितकीशी आठवणहि नसे

त्याला ! इतर कांहींहीं कारणें नसली तरी निदान एक साहित्यिक मित्र ह्या नात्यानें त्यानें माझ्या वाङ्मयीन प्रगतीविषयीं मधून मधून चौकशी करावी हें अगदीं साहजीक होतें; पण वस्तुस्थिति मात्र अगदीं भिन्न होती. आमच्या बोलण्यांत वा चर्चेंत माझ्या वाङ्मयाचा असा क्वचितच विषय निघे. आणि ही गोष्ट मात्र मला मधून मधून अस्वस्थ करी. ह्याची-आपली एवढी मैत्री, एका छापखान्याचा हा संपूर्ण चालक, त्याच्या अनेक ओळखी, कागद, शाई वगैरे छापण्याच्या वस्तूंची सर्व कोठारें ह्यास माहीत; स्वतःचीं पुस्तकें स्वतःच प्रकाशित करण्याची संधि मिळाल्यामुळें आलेला विक्री वगैरेचा अनुभव, ह्या सर्व गोष्टी अनुकूल असतांना, आपल्या लिखाणासंबंधीं व त्याच्या प्रसिद्धीसंबंधीं हा आपणापाशीं कांहींच कसा कधीं बोलत नाहीं ?

तो माझा एक गुण आहे का दोष आहे हें माझें मला अजूनपर्यंत निश्चित असें कांहीं ठरवितां आलेलें नाहीं; पण आपण कुणाजवळ एखादा शब्द टाकावा आणि तो खाली पडावा, ही कल्पनाच मला सहन होत नाहीं. कार्यबाहुल्यामुळें आपण आधींच फार लिहूं शकत नाहीं. प्रकाशकांच्या व्यापारी दृष्टीमुळें व लेखकांकडे उत्साहानें व आपुलकीनें न बघण्याच्या त्यांच्या वृत्तीमुळें आज एकदोन वर्षांत आपणाकडून वाङ्मय-प्रसूति व्हावी तशी झाली नाहीं. असं आहे तरी, टेबलाचे कप्पे उघडले तर एकदोन पुस्तकें बाहेर पडतील, एवढा हस्तलिखित माल जरा उजळा दिला कीं वाचकांच्या सेवेस हजर होण्याच्या अवस्थेंत आज आपणाजवळ नाहीं का ? तरीसुद्धां आपण होऊन एखाद्या प्रकाशकाकडे प्रकाशनाची याचना करण्याची कल्पना मला कशीशीच वाटते. राहीना का पडून माल—येईल केव्हां तरी कामाला—आतांच काय गर्दी आहे ? अशा तऱ्हेची किंचित स्वाभिमानाची तर किंचित नैराश्याची अशी वृत्ति

झाली होती माझी स्वतःबद्दलची. आणि त्याची-माझी एवढी मैत्री, एवढा परिचय असतांना तो मला केव्हांहि ह्या बाबतींत चौकसबुद्धि दाखवीत नसे. ही गोष्ट माझ्या मनांत मधून मधून येत असे हें जरी खरें असलें, तरी त्यायोगें आमचे मैत्रीचे तराजू खालीवर झालें होते असें मुळींच नव्हे.

× × × ×

बाड ह्या दिवशीं मजकडे सहजच आले होते का बुद्ध्याच आले होते न कळे, पण बोलतां बोलतां त्यांनीं मला प्रश्न केला—

" तुम्हीं हल्लीं लिहित का नाहीं ? "

" जीवन-व्यवसाय आणि इतर कामांची एवढी दगदग असते कीं वाङ्मयसेवेस वेळच मिळत नाहीं."

" हें कांहीं बरें नाहीं....तुम्हांला लिहितां येतें—तुमचं लिखाण ज्यांना आवडतं त्यांच्याकरितां तरी तुम्हीं वेळांत वेळ काढून कांहीं तरी लिहिलंच पाहिजे. तुमच्यापासून बरेच लोक, निदान मी तरी बरीच मोठी अपेक्षा करतो...."

" तुमचं म्हणणं खरं आहे, बाड," त्या कळकळीच्या भाषणानें मीहि अधिक मोकळेपणानें बोलूं लागलो. " पण, प्रकाशनाची सोय तुम्हांला वाटते तितकी सोपी आहे का ? "

" का ? तुम्ही लिहिलेली गोष्ट परत होईल असं वाटतं तुम्हांला?"

" वाटतं आणि वाटत नाहीं ....अहो, आज परिस्थिति अशी आहे कीं, संपादक आणि प्रकाशक ह्या दोन व्यक्ती लेखकांना वाटाडे, मार्गदर्शक आणि उजेडांत आणणारे असण्याऐवजीं ते त्यांच्या मार्गीतील धोंड होऊन बसले आहेत. परवां मी ऐकलें कीं एका संपादकानें, नव्हे उपसंपादकानें, एका प्रमुख साहित्यिकाला आपलें अस्तित्व दाखविण्याच्या ईर्षेनें, त्याची गोष्ट मागवून ती ठरलेल्या अंकांत न छापतां गोष्ट पसंत नाहीं परत पाहिजे असल्यास एक आण्याचें तिकिट पाठवा

म्हणून पत्र पाठविलें. ही गोष्ट खरी-खोटी कोणास ठाऊक ! पण, बस्तु-स्थिति मात्र ही आहे खास ! एखाद्याचा ग्रंथ प्रकाशित करणें म्हणजे त्याच्यावर मोठा उपकार करणें होय, अशी आजच्या प्रकाशकांची समजूत झालेली दिसते."

" तें सगळं खरं आहे, पण काय हो ! तुमचे आणि विश्वासरावाचे संबंध कसे काय आहेत हो ? "

मला त्या प्रश्नाचा प्रथम अर्थबोधहि झाला नाहीं. विश्वास तर माझा मित्र होता. त्याच्या-माझ्या बरेच वेळां भेटी होत असत. आणि मग ह्या प्रश्नाच्या मागें काहीं गूढार्थ आहे किंवा काय ह्याची मला शंका आली.

" विश्वासचे आणि माझें संबंध चांगले आहेत कीं—पण का बरं ? " मी प्रतिप्रश्न केला.

" तुमचा शल्यें नावाचा संग्रह तयार आहे ना ? त्याचें हस्त-लिखित मला वाचायला द्याल का ? " माझ्या प्रश्नाला उत्तर न देतांना, माझें समाधान न करतांनाच बाडांनी मला दुसराच प्रश्न विचारला.

" तसा कुठें अजून मी तो संग्रह एकत्रित केला आहे ? कांहीं लेख मुंबईस आहेत, काहीं येथें टेबलांत आहेत, कपाटांत आहेत, कांहीं अजून लिहावयाचे आहेत "

" लिहावयाचे आहेत अजून कांहीं ? " बाडनीं आश्चर्यानें विचारलें.

" हो, का ? त्यात आश्चर्य काय वाटलं तुम्हाला ? आहेत त्यांची जुळवाजुळव, काटछाट, आणि नाहींत ते भराभर लिहून काढायला उशीर किती ? सगळं कांहीं डोक्यांत आहे—ढांचणं आहेत माझ्या-जवळ....जेमतेम १५ दिवसांचें काम....!"

" मग, विश्वासराव काय म्हणत होते कीं त्यांनीं तुमचा शल्यें हा संग्रह सगळा वाचला आहे आणि....?"

" आणि काय ?"

बाड चाचरले....

" आपण मित्र आहोंत—तोहि माझा मित्र आहे, तो काय म्हणाला तें स्पष्ट सांगा कीं......."

" त्याचं असं झालं कीं, मी विश्वासरावांना एकदां विचारलं होतं कीं तुम्हीं " शल्यें " हा संग्रह प्रकाशित कां करीत नाहीं ? पण त्यावर त्यानीं मला सागितलें की, त्यांनीं तो संग्रह संपूर्ण वाचला आहे आणि. ..जाऊं द्या तें...."

" जाऊ द्या का ? सागा की..."

" उगीच गैरसमज होण्याचा संभव आहे."

" माझा गैरसमज कधीहि व्हायचा नाहीं—"

" ते म्हणाले कीं, शल्यात काहीं अर्थ नाहीं—त्यांचीं शल्यें त्यांनांच बोंचत आहेत !"

मन कितीहि निग्रही ठेवण्याचा प्रयत्न केला तरी खरं सांगायचं म्हणजे त्या वाक्यांनीं खरोखरीच चागला चावा घेतला होता-माझा चेहरा ओळखून तो पुन्हां निर्विकार करून मी बाडनां म्हटलें—

" त्याचं तें कदाचित प्रामाणिक मत असेल—पण मी एवढं मात्र निश्चित सागूं शकेन कीं, प्रस्तुत-संग्रह विश्वासनें वाचला आहे ही गोष्ट मात्र माझ्या कानांत शिरत नाही; कारण, तो कोणच्या रूपांत असा तयारच नाहीं अजून..."

" तुम्हांला खरं सांगायचं म्हणजे तुमच्या शल्यात कांहीं अर्थ नसेल हें मला प्रथम पटलेंच नाहीं—दुसरं असं की, त्यानें दुसरें वाक्य जें जरा उपहासानेंच उद्गारलें त्याबद्दल मला आणखी एक

संशय असा आला कीं, तुमचे-त्यांचें संबंध जरा बिघडल्यासारखें झालें आहेत कीं काय ?"

"तसं काही नाही बुवा—मला वाटतें परवांच आम्हीं एकत्र बसलों होतो. तो आपलें नवीन एक पुस्तक आपल्या छापखान्यांत सध्यां छापून घेत आहे. त्याच्यांतील एक प्रकरण तो त्या दिवशीं हौसेनें मला वाचून दाखवीत होता..."

"काय असेल तें असेल बुवा...पण तुमचीं 'शल्यें' पुरी करून मला जरा वाचायला द्या कीं लवकर...आणि तुम्हीं लिहित सुटा... प्रतिभेला पायबंद घालून कसं चालेल हो ?"

वाड निघून गेले.

अन् मग मात्र बराच वेळ मी स्वतःशीच जरा त्रस्त होऊन बसलों होतों. वस्तुस्थिति अशी होती कीं माझीं शल्यें प्रकाशित होण्याचा हव्यास कुणाहि प्रकाशकाजवळ मी धरला नव्हता. ही शल्यें म्हणजे एकाच व्यक्तीचें अनुभव नव्हते. [illegible]माणसाना, व्यक्ती-व्यक्तीना हरघडी भासणाऱ्या शल्याचा हा संग्रह होता. ही सारीं शल्यें मला व्यक्तिशः सारींच्या सारीच बोचत राहण्याचें कारण नव्हतें. उलट, त्यापैकीं जीं शल्यें माझी स्वतःचीं अशीं होती त्याची बोचणी अगर टोंचणी मला होत असेल तर माझ्या सहृदयाबद्दल मला अभिमानच वाटला पाहिजे, त्यांत उपहासाचें प्रयोजनच काय ? शल्यें प्रत्येक माणसास बोचत असतात. सदसद्विवेकबुद्धि जागृत असलेल्याना त्यांची जाणिव होतें, तर बेडर-वृत्तीच्या लोकांना त्यांचें कांहींच वाटत नाहीं एवढेंच!

मग मी स्वतःशींच विचार करूं लागलों कीं, विश्वासनें वाडना सांगितलें कीं, शल्यें हा संग्रह मी वाचला आहे, तो कसा आणि केव्हां ? मास्तरांच्या मासिकांत छापून आलेला लेख बगळला तरी बाकीच्या लिहून झालेला शल्यांपैकीं कांहीं शल्यें वाचण्याचा प्रसंग

विश्वासवर आला होता कीं काय ? स्मृतीला ताण दिल्याबरोबर एका दिवसाची मला आठवण झाली.

एक दिवस प्रसिद्ध, अप्रसिद्ध लेखाची कात्रणें कांही एका क्रमानें मी लावीत बसलों होतों, आणि तेवढ्यांत त्यावेळीं विश्वास मजकडे आला होता.

"हें काय काढलंय बुवा आज ?"

"मास्तरांच्या त्या मासिकांत छापलेली माझी गोष्ट आठवते कां ? त्याच्यासारखीच ही एक आहे—माझं—हेंहि एक शल्य .."

"अस्सं !"

आणि काय असेल तें असो; स्वतःस न कळतच जणुं माझ्या समोरचें तें हस्तलिखित हाती धरून मी तें वाचण्यास सुरवात केली ती गोष्ट माझ्या मतें 'ए–वन्' होती. पण त्याचें त्या गोष्टीकडे लक्ष होते, अगर नाही। कुणास ठाऊक ! तो जांभया देऊं लागलासा दिसला. माझी गोष्ट ऐकताना एवढें औदासिन्य मी त्याच्याच तोंडावर पाहिलें प्रथम ! गोष्ट वाचून पुरी झाली.

गोष्टीचा त्याच्या मनावर योग्य तो परिणाम झालेला दिसला नाहीं. — गोष्टीच्या परिणामाबाबत कोणताच विकार त्याच्या मुद्रेवर आढळला नाही. मला भीति वाटली कीं, आपली गोष्ट इतकी कमदर्जाची झाली आहे की काय—छेः त्या गोष्टीच्या यशस्वितेविषयीं माझी संपूर्ण खात्री होती; पण ती लक्ष लावून कुणी ऐकली वा वाचली तरच उपयोग, नाहींतर बिन किंमतीचीच नाहीं का ती ?

त्यानें हंसत हंसत म्हटलें—'ठीक आहे,' 'ठीक आहे !'

'बुडत्याचा पाय खोलात' जातो म्हणतात—तो दिवस—माझ्या आयुष्यांत तितकासा चागला नव्हता. व माझ्या अंगीं लोचटपणाच अधिक आला होता.

" तुझ्यासारख्यांनीं मनावर घेतलं तर हा संग्रह यंदा काढायचा विचार आहे माझा."

पण ह्यालाहि संमति-दर्शक असें उत्तर आलेंच नाहीं !

" बघूं, बघूं...." व्यापारी पेशाचेंच कांहींतरी विश्वासनें उत्तर दिलें.

"हल्लीं कागद महाग झाले आहेत....कागद मिळतच नाहींत, खरोखरी—बघूं या केव्हांतरी...."

खरं म्हटलं तर त्याचें तसलें तें उत्तर मित्रत्वास खरोखरीच शोभण्यासारखें नव्हतें. त्याचा तो थिल्लरपणा आणि उडवाउडवी ध्यानीं येऊन पाण्यांत ढेकूळ पडल्यासारखेंच मला झालें. आपण तो प्रश्न विचारलाच नसता तर....! पण लगेच मनाला आवर घातला. जणुं कांहीं झालेंच नाहीं अशी मुद्रा केली आणि पूर्ववत् विश्वासबरोबर बोलूं लागलों.

मग त्यावर मी पुनः पुनः विचार केला. प्रकाशकाकडे याचना करावयाची नाहीं म्हणून ! आपण घेतलेलें व्रत न कळत का होईना पण आपणांकडून एकदां मोडलें गेलें. वास्तविक तें बोलणें म्हणजे नुसतें सूचनात्मक होतें...हवेमध्यें कांहींतरी शब्द फेकलें गेलें, आणि त्याच्या असंख्य लाटा बनून ते हवेंत विरून व विसरूनहि गेले होते एव्हांना. पण तरीहि विचार-चक्रें फिरतच होती ! ज्याच्या हातीं ससा तो पारधी; ज्याच्या हातीं सत्ता त्याला व्यवस्थित कारभार करण्याची अक्कल असते म्हणतात. जगांतलें, समाजांतलें सत्य आहे तें एक.

वास्तविक तो प्रसंग आणि तो दिवस माझ्या आठवणींतून अजीबात नाहींसाच झाला होता. त्याला आज असा उजळा मिळला—वाईट वाटलें. माझा मुख्य दोन गोष्टींनीं क्षोभ झाला होता. एक म्हणजे त्यानें तो संग्रह न वाचतांच त्यावर त्यांत कांहीं अर्थ नाहीं.

म्हणून अभिप्राय ठोकला होता; पण त्याहीपेक्षा त्यानें वरती जें जें उपहासाचें भाष्य केलें होतें. त्याचा निष्कर्ष माझ्या मतें असा होता की, तो मजबरोबर एक लटकी मैत्री तरी दाखवीत होता. किंवा तें तसलें उपहासा मक वाक्य माझ्यापश्चात् उच्चारून त्यानें निदान, मैत्रीच्या मर्यादा खचित् उल्लंघिल्या होत्या !

त्याचें नवीन पुस्तक प्रकाशित झालें असून प्रिय–मित्रास सप्रेम भेट म्हणून स्वाक्षरीनें मजकडे आलें आहे, व त्यावर आमची पूर्वी थोडी चर्चा झाली आहे—आणखीहि होईलच. उर्वरित प्रसंगा-विषयीं कदाचित् आमचें पुढेंमागें कधी बोलणेंहि होणार नाहीं. मी त्याच्याशीं मैत्री आहे त्या स्वरुपांत कायम राखीनच राखीन, पण, शल्यें आतां प्रकाशित होत आहेत. आणि त्याने ह्यांवर जर का कांही स्वतंत्रपणें अभिप्राय दिला, तर तो ती न वाचताच पूर्वी केलेल्या विधानांशी सुसंगत असेल का विसंगत असेल, हें पाहण्याची मात्र मला आतूरता लागून राहिलेली आहे.

अन् हें सारें जरी आता रीतसर होणार असलें तरी मानवी मनाचा एक नवीन भाग उकलून दिसल्यामुळें मैत्रीच्या माझ्या पूर्वीच्या कल्पनेला जो आघात मिळाला आहे, त्याचे हेलकावे अजून बंद झालेले नाहींत.

---

## प्रकाशित

*नजराणा*—( कादंबरी )
अरविंद् वि. गोखले

*जारिणी*—( कादंबरी )
भाऊसाहेब मंत्री

*शल्ये*—( लघुकथासंग्रह )
भ. दि. गागल.

## आगामी प्रकाशनें

*रंगाचें घर*—( कादंबरी )
भ. दि. गांगल.

*आकाशांतील देव*—(कादंबरी)
वि. वि. बापट.

*दिलीप दाते*—( कादंबरी )
चंद्रकुमार डांगे.

*बिन बियांचीं द्राक्षें*
( लघुकथा संग्रह )
जी. एम्. आपटे

*कोण्डमारा*—( कादंबरी )
र. गं. विद्वांस

*अस्तारिणी*—( कादंबरी )
अरविंद वि. गोखले

*संचीत व्यक्ति*—
अरविंद वि. गोखले.